# मी एक शिक्षक (स्तंभसंग्रह)

नासा. येवतीकर

पत्ता - मु. येवती पो. येताळा
ता. धर्माबाद जि. नांदेड
पिन - 431809

मोबाईल क्रमांक - 9423625769

Email id - nagorao26@gmail.com

Blog address - http://nasayeotikar.blogspot.com



## प्रकाशक : ई साहित्य प्रतिष्ठान

www. esahity. com

esahity@gmail. com

प्रकाशन : १४ जानेवारी २०१७ (संक्रमण)

पुस्तक  -  मी एक शिक्षक

अल्प परिचय **

** नाव : नागोराव सा. येवतीकर

** पत्ता : मु. येवती पोस्ट येताळा

ता. धर्माबाद जि. नांदेड

** व्यवसाय : प्राथमिक शिक्षक

जिल्हा परिषद प्राथमिक शाळा चिरली

ता. बिलोली जि. नांदेड

जन्मदिनांक : 26 एप्रिल 1976

छंद : शालेय जीवनापासुनच लिखाण करण्याची फारच आवड त्यामुळे विविध वर्तमानपत्र, दैनिक, साप्ताहिक, मासिकात वैचारिक लेख लिहिण्याचा छंद आहे. जीवन-शिक्षण या शैक्षणिक मासिकातून सुध्दा यापूर्वी लेख प्रकाशित झाले आहेत. सध्या दैनिक लोकपत्रच्या दर सोमवारी ऑफ पिरियड सदराखाली क्रमशः लेख प्रकाशित होत आहेत, ज्यात शैक्षणिक विषयी विचार मांडत असतात. लहान मुलांसाठी सुध्दा छोटेखानी लेख लिहितात तसेच त्याना मनोरंजनातून शब्दसंपत्ती वाढवी यांसाठी विविध मनोरंजक शब्दकोडे तयार करतात. जे की दर रविवारी दैनिक देशोन्नतीच्या फनक्लब पेज वर गेल्या दीड वर्षापासुन क्रमशः प्रकाशित होत आहे. विद्यार्थ्यांना सतत कामात व्यस्त ठेवण्यासाठी विविध उपक्रम तयार करतात आणि त्यां उपक्रमाच्या माध्यमातून शिकविण्याचा प्रयत्न असतो.

मी एक शिक्षक आहे ........

जनगणना असो वानिवडणूक

सदैव मी सज्ज असतो

देशातल्या प्रत्येक कामात मी

नेहमीच दक्ष असतो

कारण ................

मी एक शिक्षक आहे ........

लहानमोठे सान थोर

सर्वच नमस्कार करतात

गावातील सर्व लोक मला

मान सन्मान देतात

कारण ................

मी एक शिक्षक आहे ........

नाते अमुचे घट्ट झाले

ते मला मायबाप समजतात

शाळेत माझी चिमुकली मुले

रोज आतुरतेने वाट पाहतात

कारण ................

मी एक शिक्षक आहे ........

छोट्या मोठ्या कार्यक्रमाचे
निमंत्रण न विसरता देतात
लग्न असो वा इतर अन्य काम
लोकं मला न विसरता बोलावतात
कारण ...............
मी एक शिक्षक आहे ........

माझ्या येण्यावर अन जाण्यावर
लोक घड्याळाची वेळ ठरवितात
कारण ...............
मी एक शिक्षक आहे ........

शासन सुद्धा प्रत्येक शासकीय काम
फक्त आणि फक्त माझ्याकडून
पूर्ण करून घेतात
कारण ...............
मी एक शिक्षक आहे ........

मला चार चौघात अगदी
शिस्तबध्द राहावे लागते
नियमाचे पालन तंतोतंत करावे लागते
कारण ...............
मी एक शिक्षक आहे ........

इतर लोकांसारखे मला कसलेही
शान शौक करता येत नाही
सैराट होऊन जीवन जगता येत नाही
कारण ................
मी एक शिक्षक आहे ........

म्हणूनच समाजात, गावात
माझी खूप शान आहे बान आहे
माझ्या बोलण्यात आजही जान आहे
कारण ................
मी एक शिक्षक आहे ........

मला स्वतः चा खूप अभिमान आहे
अन मी आज स्वाभिमानी ही आहे
कारण ................
मी एक शिक्षक आहे ........

मी एक शिक्षक आहे ........

- नागोराव सा. येवतीकर

# तस्मै श्री गुरवे नम:

'गुरूब्रम्हा, गुरूविष्णू, गुरूदेवो महेश्वर:

गुरू साक्षात परब्रम्ह तस्मै श्री गुरवे नम:

भारतीय संस्कृतीमध्ये गुरूला खूप मोठे आदराचे व मानाचे स्थान आहे. गुरूमुळे जीवनातील अंधकार नाहीसा होऊन ज्ञानाचा प्रकाश पसरतो. म्हणूनच पुरातन काळ म्हणजे रामायण व महाभारताच्या काळापासून गुरूला अनन्य साधारण असे महत्त्व आहे. या काळातील राजे-महाराजे गुरूच्या सल्ल्याशिवाय पुढील मार्गक्रमण किंवा काम ठरवीत नसत. राजेमंडळी गुरूंना आदर व सन्मान देत असत त्यामुळे राज्यातील जनता सुद्धा त्यांचा आदर करीत असत. गुरूच्या मनाविरूद्ध वागल्यास गुरू क्रोधीत होतील, त्यांना संताप येईल आणि रागाच्या भरात शाप देतील अशी भिती सुद्धा लोकांच्या मनात होती. याचाच अर्थ पूर्वीच्या काळी समाजात गुरूचा फार मोठा दबदबा होता. त्यांच्याजवळ असलेल्या ज्ञानाचा वापर राज्यातील लोकांच्या कल्याणासाठी करून घेण्याची कला राजा जवळ असणे आवश्यक होती. त्याकाळात गुरूगृही जाऊन विद्या शिकण्याची पद्धत होती ज्यास 'गुरूकूल' पद्धत असे संबोधल्या जाई. परंतु या गुरूकूल मध्ये काही ठराविक लोकांनाच विद्यादान केल्या जात असे. कारण द्रोणाचार्य गुरूंनी एकलव्यास विद्या शिकविण्यास नकार दिला होता परंतु त्याच्या गुरू भक्तीमुळे त्याला ज्ञान मिळविता आले. याचा एक अर्थ आपण असा काढू शकतो की, त्याकाळी सुद्धा गुरूंना शासनाचे (राजांचे) ऐकावेच लागत असे. राजाच्या परवानगी शिवाय राजगुरूला कोणालाही शिकविता येत नव्हते.

कालाय तस्मै नम: नुसार काळ बदलत गेला आणि त्या अनुषंगाने समाज सुद्धा बदलत गेला. गुरूच्या घरी जाऊन शिकण्याच्या पद्धतीत म्हणजे गुरुकूल हळूहळू बदल होत गेला. गुरूची जागा शिक्षकाने घेतली. समाजात आज वेगवेगळया क्षेत्रात वेगवेगळे प्रकारचे गुरू आहेत. मात्र समाजाचा सर्वात जास्त विश्वास ज्या गुरूवर आहे तो म्हणजे शिक्षक. परिस्थितीनुसार काळ बदलत राहतो आणि काळानुरूप परिस्थिती बदलते. लोकशाहीर

अण्णाभाऊ साठे फक्त दीड दिवस शाळेत गेले, त्यांना शाळेतला गुरू लाभलाच नाही तर ते एवढे मोठे साहित्यिक कसे झाले? गुरूदेव रविंद्रनाथ टागोर एक दिवस शाळेत जाऊन एवढे महान कवी कसे बनले? कवयित्री बहिणाबाई चौधरी एकही दिवस शाळेत न जाता प्रसिद्ध साहित्यिक कसे बनू शकल्या? तर त्याचे उत्तर आहे अनुभव. त्यांचा गुरू होता अनुभव आणि विलक्षण बुद्धीमत्ता यामुळे ते शक्य झाले. परंतु आपण सामान्य असलेले व्यक्ती आपणाला पदोपदी मार्गदर्शन करणारे, दिशा देणारे आणि रस्त्यावरून चालवत नेणाऱ्या गुरूची गरज भासते. गुरूविना आपले जीवन अपूर्ण आहे.

शिक्षणाशिवाय तरणोपाय नाही असे सांगणारे महात्मा जोतिबा फुले यांनी शिक्षणाचा प्रसार व प्रचार करण्यासाठी आपले संपूर्ण आयुष्य वेचले. एवढेच नाही तर त्यांच्या पत्नी क्रांतीज्योती सावित्रीबाई फुले यांनी सुद्धा अपार कष्ट सोसले. लोकांकडून फुले दाम्पत्याचा खूप छळ केला गेला पण त्यांनी शैक्षणिक कार्य थांबविले नाही. भारतात शिक्षणाचा प्रसार करण्यात फुले दाम्पत्याचा सिंहाचा वाटा आहे. त्यांच्या अथक प्रयत्नामुळे आज आपणास गाव तेथे शाळा बघायला मिळत आहे आणि तळागाळातील व्यक्ती सुध्दा शिक्षण घेत आहे.

आज शासनाचे मोफत व सक्तीचे प्राथमिक शिक्षण असे सध्या जे बोलल्या जात आहे ते महात्मा फुलेंनी सन १८८२ मध्ये हंटर कमिशनच्या समोर दिलेल्या साक्षी मध्ये म्हटले होते की " सहा ते चौदा वयोगटातील सर्व बालकांना मोफत व सक्तीचे प्राथमिक शिक्षण दिले जावे " परंतु त्यांना त्याकाळी अनेक वाईट प्रसंग आणि अनुभवास तोंड द्यावे लागले. १ जानेवारी १८४८ रोजी पुण्यातील भिडे वाड्यात मुलींसाठी देशातील पहिली शाळा सुरू केली परंतु त्या ठिकाणी शिकविण्यासाठी कोणीच तयार होईना. शिकविण्याचे काम बऱ्याच जणांना तुच्छतेचे वाटत असे. तसेच शिकविण्याचे काम हे येड्यागबाळयाचे नाही, त्यासाठी खूप मोठी विद्या जवळ असावी लागते असा समज होता. परंतु जोतिबांनी आपल्या निरक्षर पत्नीला म्हणजे सावित्रीबाईला शिकविले आणि देशातील पहिली महिला शिक्षिका होण्याचा मान दिला. समाजात गुरूला कोणत्या संकटाला, त्रासाला तोंड द्यावे लागत होते याची प्रचिती यावरून आपणाला येते. समाजात हळूहळू शिक्षणाचा प्रसार होऊ लागला. शिक्षणाचे महत्व लोकांना कळू लागले. देशातील नेते आणि पुढारी समाजातील लोकांना शिक्षणाचे महत्त्व पटवून सांगू

लागले. शिक्षणाविषयी भारतीय घटनेचे शिल्पकार डॉ.बाबासाहेब आंबेडकर म्हणतात की, 'शिक्षण हे वाघिणीचे दुध आहे ते जो प्राशन करेल तो गुरगुरल्या शिवाय राहणार नाही.' त्याच सोबत ते लोकांना स्वत:चा समाजाचा विकास करायचा असेल तर 'शिका, संघटित व्हा आणि संघर्ष करा' असा मंत्र दिला. त्यामुळे भारत स्वातंत्र्य झाल्यानंतर शिक्षणाचा खेडोपाडी दरी खोऱ्यात प्रसार केला. शाळा तर उघडल्या जात होत्या मात्र त्यांना शिकविण्यासाठी कोणीच पुढे येत नव्हते. सन १९९० च्या दशकापर्यंत मुलांना शिकविण्यासाठी 'शिक्षक' म्हणून नोकरी करण्यासाठी पुढे येणाऱ्यांची संख्या फारच कमी होती. कारण या काळात उत्तम शेती, मध्यम व्यापार आणि कनिष्ठ नोकरी असे समजलं जात असे. त्यामुळे सहसा कोणी पुढे येत नव्हते. जे शिक्षक म्हणून काम करीत होते ते कधी तिकडे व्यवसाय म्हणून पाहिले नव्हते. ती त्यांची एक प्रकारे सेवा होती. असा त्यांचा स्वभाव होता.

निस्व:र्थ म्हणता येणार नाही परंतु जेवढे मिळते तेवढय़ावर समाधान मानून सेवाभावी मनाने काम करणारी शिक्षक मंडळी समाजात मानाचे स्थान मिळवून गेले.

आज शाळेतील शिक्षक मंडळी तणावाखाली वावरत आहेत असे म्हटले तर शिक्षकी पेशा सोडून जी मंडळी आहे त्यांना हसू येते आणि विनोदबुद्धी सुचते. मात्र जे या क्षेत्राशी निगडीत आहेत त्यांना हे सत्य आहे असे वाटेल. शाळेमधून मुलांवर संस्कार करण्याचे काम शिक्षकांनी करणे खरे तर आवश्यक आहे. मात्र किती शाळेतून मुलांवर संस्कार केले जातात. याची चाचपणी केल्या जात नाही. कारण आज त्यांना अभ्यासक्रमासमोर संस्कार काहीच वाटत नाही. दिलेला अभ्यासक्रम पूर्ण झाला नाही तर त्यांना वाईट बाबीशी सामना करावा लागतो त्यामुळे ते मुलांना समजेल अश्या भाषेत न शिकविता एका पाठोपाठ एक धडे संपविण्याचा सपाटा चालवितात. अपेक्षित बदल पाहण्यापेक्षा त्याच्या गुणाकडे शिक्षकासोबत पालक ही लक्ष देत आहेत त्यामुळे मुले भावनाहीन बनत आहेत. येथूनच समाज रसातळाला जाणे प्रारंभ झाली म्हणणे अतिशयोक्तीचे ठरणार नाही. समाजात आज सुद्धा तस्मै श्री गुरवे नम: ची खरी गरज आहे. फक्त शिक्षक दिन आले म्हणून शिक्षकांचा सन्मान किंवा सत्कार न करता या दिवसांसारखे रोजच त्यांना सन्मान देणे खरेच गरजेचे आहे असे वाटते.

# शिक्षकांच्या हातात खडू द्या . . . . . !

दिवाळीची सुट्टी सुरू होण्याच्या पूर्वसंध्येला संपूर्ण महाराष्ट्र विजय नकाशे सरांच्या आत्महत्येच्या बातमीने हादरून गेला.

अमरावती जिल्ह्यातील चिखलदरा पंचायत समितीअंतर्गत असलेल्या सेमाडोह येथील अतिदुर्गम भागातील जिल्हा परिषद प्राथमिक शाळेतील प्राथमिक शिक्षक जे की मुख्याध्यापकपदाचे अतिरिक्त कारभार पाहत होते ते विजय नकाशे यांनी पंचायतराज कमिटी अर्थात पीआरसीच्या दौऱ्यानंतर शाळेतच आत्महत्या केली. फारच क्षुल्लक करणावरून त्यांनी आत्महत्या केली. ते कारण म्हणजे तांदळाच्या हिशेबात ३० किलो तांदूळ कमी दिसून आले आणि तारीख संपलेली मिरची पावडर पाकीट आढळून आले, त्यामुळे त्यांना निलंबित करण्यात येणार असल्याची खात्री झाली. त्यांचे मानसिक संतुलन बिघडले आणि एका प्रामाणिक व कर्तव्यदक्ष गुरुजींचा बळी गेला. शाळेतील मुलांना शिकवले नाही, तिथे हलगर्जीपणा केला, हयगय केली यामुळे जर शिक्षकांना निलंबित करण्यात आले असते तर कदाचित योग्य झाले असते. कारण ज्या कामासाठी नेमणूक करण्यात आली ते काम जर केले नाही तर कोणीही यात चूक दाखवणार नाही. मात्र इथे शाळेतून सध्या शिकवणे फारच कमी म्हणण्यापेक्षा नाही म्हटलं तरी चुकीचे ठरणार नाही. कधी कधी तर असे वाटते की, शिक्षकांची नेमणूक ही अध्यापनापेक्षा इतर अवांतर कामांसाठीच जास्त प्रमाणात उपयोगी पडते. शासनाच्या काही योजनांतून शिक्षक जर वजा केले तर त्यांच्या सर्व योजना तळागाळापर्यंत पोहोचतच नाहीत. शिक्षकांवरील अशैक्षणिक कामे संपवली जातील, त्यांना निवडणुका किंवा जनगणना याशिवाय इतर कामे लावण्यात येणार नाहीत असे फक्त म्हटले जाते. प्रत्यक्षात मात्र काही होत नाही. या लोकांचे बोलायचे दात आणि खायचे दात पूर्णत: वेगळे आहेत. यांना 'बोलावे तैसे चालावे' ही संतांची वचने माहीत आहेत. कळतंय, पण वळत नाही अशी परिस्थिती आहे. प्राथमिक शिक्षकांची नेमणूक ही शाळेतील ६ ते १४ वयोगटातील बालकांना अध्यापन

करण्यासाठी होते. नव्यानेच रुजू झालेला शिक्षक मोठ्या उत्साहाने आणि जोमाने शिकवायला प्रारंभ करतो. उद्याचा हिंदुस्थान सक्षम असावा आणि तो मी घडविणार या प्रेरणेने तो काम करीत असतो. सुरुवातीचे काही दिवस त्याच्या मतानुसार घडतेसुद्धा. अध्यापनात त्याला बहुतांश वेळा अडथळा येतो. ज्यावेळी त्याच्या हातात खडू यायचे त्याच नेमक्या वेळी नाइलाजास्तव पेन घेऊन बसावे लागायचे. वारंवार असेच घडत राहिल्यामुळे तो पूर्णत: खडू बाजूला ठेवून हातात फक्त पेनच धरायला लागला. त्याच्या मनात कधीच असे आले नाही, मात्र ते जर पेन हातात घेतले नाही तर वरिष्ठ कार्यालयातून हातात कागद यायला वेळ लागत नाही याची भीती त्याच्या मनात नेहमीच असते. त्यामुळे तो कागदी घोडे (अहवाल) पूर्ण करण्यात असा काही रुततो की शाळेत विद्यार्थी अध्ययनासाठी आले आहेत याचे जरासुद्धा भान नसते. शिक्षकांच्या हातात खडूशिवाय काहीच राहू नये अशी परिस्थिती कधी तयार होईल देव जाणे! ज्या दिवशी अशी परिस्थिती तयार होईल त्याच दिवसापासून ‘प्रगत महाराष्ट्र’ दिसायला लागेल.

शिक्षकांच्या हातात खडूऐवजी पेन घ्यायला कोणी लावले? विजय नकाशे या शिक्षकाचा बळी या अशैक्षणिक कामाने घेतला नाही काय? असे नाना प्रकारचे प्रश्न मनामध्ये निर्माण होतात. शिक्षकांना अशैक्षणिक कामे देऊ नका याविषयी शिक्षक संघटनासुद्धा विरोध करीत असते, मात्र येथे ‘आले सरकारच्या मना तेथे कुणाचे चालेना’ अशी परिस्थिती आहे. सरकारी कर्मचारी म्हणजे गप्प गुमानपणे, खाली मान घालून, सांगेल ते काम करणारी व्यक्ती अशी स्थिती निर्माण केली. कुणालाही वर तोंड करून बोलण्याची मुभा नाही. जर एखाद्या कर्मचाऱ्याने तशी हरकत केली तर त्याची मुस्कटदाबी केली जाते. त्याचा आवाज बंद केला जातो. निलंबनाची धमकी तर कर्मचाऱ्यांच्या पाचवीलाच पुजलेली आहे. त्यास्तव त्या कर्मचाऱ्यांच्या मानेवर नेहमी टांगती तलवार असते.

गावातील शाळेचा विकास गावातील लोक आणि ग्रामपंचायत यांच्या माध्यमातून व्हायला पाहिजे. शाळेतील कमतरता शिक्षकांना ग्रामपंचायतीकडे मागणी करता यावी अशी परिस्थिती असावी. सध्या उलट परिस्थिती आहे. ग्रामपंचायतच शाळेची, मुख्याध्यापक व शिक्षक यांची तक्रार करते. शाळेत पाण्याची व्यवस्था करण्याऐवजी उलट्या बोंबा मारते. हे कुठे तरी थांबले पाहिजे. शिक्षकाच्या हातात फक्त खडूच द्या. शिक्षणाचा दर्जा नक्कीच उंचावेल यात शंका नाही.

शिक्षक बनला बांधकाम मजूर

शिक्षक आज अध्यापनाऐवजी काय काय कामे करतो. शिक्षकांच्या हातात आज खडूऐवजी काय काय आहे? सर्वात पहिल्यांदा शिक्षकांना शाळा व वर्गखोली बांधकामात गुंतवून अभियंता व मिस्त्री बनवले आणि त्यांच्या हातात थापी, वीट, वाळू, सिमेंट आणि गजाळी दिली. शासनाचा बांधिलकी असलेला कर्मचारी असल्यामुळे बांधकामाबाबतचा दर्जा चांगला मिळत गेला म्हणून शासनाने सन २००१ पासून सर्व बांधकामे शिक्षक म्हणजे मुख्याध्यापकांच्या माध्यमातून करण्यास प्रारंभ केला. यातसुद्धा आतापर्यंत अनेक 'विजय' पराजित होऊन आत्महत्या केली आहे. खडूऐवजी त्यांच्या हातात झाडू देण्यात आली. शालेय साफसफाई आणि स्वच्छतागृहाच्या नियमित वापरासाठी मुख्याध्यापकाला जबाबदार धरण्यात येऊ लागले. शालेय पोषण आहार योजनेमधून आचारी बनविण्यात आले. भाजीपाला घेऊन येणे आणि स्वयंपाक तयार होईपर्यंत त्याकडे लक्ष देणे ही नित्याचीच बाब झाली आहे. जेवणात काही कमी जास्त झाले की निलंबनाची टांगती तलवार तर नेहमीच तयार राहते. निवडणूका आणि जनगणना करणे हे तर राष्ट्रीय कार्य असल्यामूळे ते टाळता येत नाही. शिक्षक आत्ता हायटेक झाला आहे. सर्वच शिक्षक स्मार्टफोन धारक झाले आहेत. मोबाईल मुळे माहिती तंत्रज्ञानात सुध्दा आमूलाग्र बदल झाले आहेत. याचा फायदा शैक्षणिक क्षेत्रात सुध्दा व्हावे म्हणून शालेय शिक्षण विभागाने राज्यांतील सर्व शाळा ऑनलाइन करण्याच्या हेतूने सरल प्रणाली विकसित केली. मात्र यात परत एकदा शिक्षकानाच वेठीस धरण्यात आले. अल्पसंख्यकांचे शिष्यवृत्ती असो की मागासवर्गीयांच्या विद्यार्थ्याची शिष्यवृत्ती त्यांची माहिती सुध्दा ऑनलाइन भरावे लागत आहे. त्यामुळे शिक्षक आत्ता सॉफ्टवेअर इंजिनीयर सुध्दा बनला आहे. शाळेत विद्युत सुविधा नाही, संगणक नाही ना त्याला इंटरनेट नाही तरी ऑनलाइन काम करण्याच्या सूचना वरच्या पातळीवरून दिल्या जातात आणि शिक्षक मुकी  बिचारी कुणी ही हाका प्रमाणे सर्वांचेच बोलणे ऐकून काम करीत असतो. कधी कधी हे सरकारी काम पूर्ण करीत असताना शाळा वाऱ्यावर असल्याचे वृत्त सुध्दा वाचण्यास येतात. तेंव्हा यांस खरोखरच शिक्षक जबाबदार असतो का ? याचा सारासार विचार ही कोणी करीत नाहीत. शिक्षकाच्या डोक्यावर खापर फोडून सर्वजण मोकळे होतात. म्हणून राज्यांतील तमाम शिक्षक बांधवाची करुण हाक आहे की " शिक्षकाच्या हातात खडू द्या

# मरावे परी कीर्तिरूपे उरावे

आज भारताचा 68 वा स्वातंत्र्य दिन. ह्या सोनेरी दिवसाची पहाट पाहण्यासाठी कित्येक लोकांना आपले प्राण गमवावे लागले. आजच्या दिवशी आपण ह्या सर्व थोर मंडळीची आठवण करतो

" भारतमाता की जय " असा नारा देतांना त्या छोट्याशा शिरीषकुमारची आठवण आल्याशिवाय राहत नाही. तो शाळकरी वयाचा म्हणजे जेमतेम 10 वर्षाचा होता. इंग्रजांचा विरोधात नारे दिल्यामुळे आणि भारतमातेची सेवा केल्यामुळे त्याला इंग्रजांनी ठार केले. परदेशी कपड्यांच्या गाडीसमोर स्वतःचे बलिदान करणारे बाबू गेनूला आपण कसे विसरू. शिरीषकुमार व बाबू गेनू आज आपल्यात नाहीत परंतु त्याच्या आठवणी, त्याचे कार्य अजूनही स्मरणात आहे. आपण ते कधीच विसरु शकत नाही.

भारतीय स्वातंत्र्यलढ्याच्या काळात लोकमान्य टिळक, महात्मा गांधी, नेताजी सुभाषचंद्र बोस, मौलाना अबुल कलाम आझाद, डॉ. बाबासाहेब आंबेडकर इत्यादी अनेक जणांनी देशाच्या स्वातंत्र्यासाठी चळवळ उभी केली व देशाला गुलामगिरीतून मुक्त केले. त्यापूर्वी महात्मा ज्योतिबा फुले व क्रांतीज्योती सावित्रीबाई फुले यांनी पुणे येथील भिडेच्या वाड्यात मुलींसाठी पहिली शाळा सुरू केली. समाजातील रुढ, परंपरा व सनातन पद्धतीच्या काळात फुले दाम्पत्याना खूप हालअपेष्टा सोसावे लागले. तरीही त्यांनी न डगमगता शिक्षणाचा प्रचार व प्रसार करण्याचे महान काम केले त्यास्तव शैक्षणिक क्षेत्रातील त्याचे कार्य विसरून चालणार नाही. हिंदवी स्वराज्य निर्मितीसाठी छत्रपती शिवाजी महाराज यांनी आपले संपूर्ण आयुष्य अर्पण केले हे तर लक्षात राहतेच शिवाय त्यांना घडविणारी राजमाता जिजाऊ यांची आठवण पदोपदी येत राहते. सहा महिन्यांचे तान्हे बाळ पाठीशी बांधून इंग्रज लोकांशी दोन हात करणारी आणि मेरी झाँसी नहीँ दूँगी अशी ठणकावून सांगणारी राणी लक्ष्मीबाई चे शौर्य

आमच्यासाठी नेहमीच प्रेरणा देत राहील. गरीब व अनाथांची आई मदर तेरेसा हे त्यांच्या अविरत सेवेमुळे कायम स्मरणात राहतात.

या सर्वच लोकाना जाऊन इतकी वर्षे झाली तरी त्यांचे नाव आपण स्मरणात ठेवतो, आठवण करतो, त्यांना विसरत नाही. कारण त्यांनी कामाच असे केले आहे की त्यास कोणीच विसरू शकत नाही यालाच म्हणतात मरावे परी कीर्तिरूपे उरावे.

आपणाला सुद्धा असेच काही लोकांच्या आठवणीत, स्मरणात रहावे असे कार्य करणे गरजेचे आहे. तसा निर्धार आपण करायला हवे. प्रसिद्ध विचारवंत साईरस म्हणतो की, ' कीर्ती मिळविण्यासाठी चांगल्या प्रकारची पुष्कळ कामे करावी लागतात ; मात्र अपकिर्ती होण्यासाठी एक वाईट काम पुरेसे असते'. अनेक लोक जन्मतात आणि किती तरी लोक रोज मरण पावतात. परंतु ज्यांनी समाजाच्या उपयोगी पडेल असे काम केले आहे त्यांचीच समाजामध्ये कीर्ती आणि नाव शिल्लक राहते. स्वतःसाठी किंवा स्वतःच्या कुटुंबासाठी अहोरात्र कष्ट करणाऱ्या व धडपडणाऱ्या व्यक्तीला त्याच्या कुटुंबातील सदस्यच तेवढे लक्षात ठेवू शकतात. त्यामुळे हेन्री एस. सटन यांनी म्हटल्याप्रमाणे ' कीर्ती मिळवायचे असेल तर दुसऱ्याचे अश्रू पुसण्यचे प्रयत्न करा'. आपण जेंव्हा इतरांचे दुःख समजून घेऊन त्याना हातभार किंवा दिलासा देतो तेंव्हा त्याच्या मनात आपल्याविषयी करुणा, प्रेम, माया आणि ममतेची भावना निर्माण होते आणि नक्कीच आपली कीर्ती होते. या जगात आपण रिकाम्या हाताने आलोत आणि रिकाम्या हातानेच परत जाणार आहोत ही जगज्जेता सिकंदराची शिकवण विसरून चालणार नाही. कवी भा. रा. तांबे आपल्या कवितेत म्हणतात की, ' जन पळभर म्हणतील हाय हाय, मी जाता राहील कार्य काय ? ' असा प्रश्न त्यांनी सर्वांना विचारला  परंतु आपल्या मृत्यूनंतर या जगात काय उरते तर ते फक्त नाव आणि कीर्ती. म्हणून आपल्या माघारी आपले नाव सर्वांनी घ्यावे असे वाटत असेल तर काही जगापेक्षा वेगळे करू या. स्वातंत्र्यदिनाच्या सर्व भारतीयांना खूप खूप शुभेच्छा. जय हिंद.

# सुंदरता महत्वाची की गुणवत्ता*

शिक्षण आज गरिबासाठी नाही, असे म्हटले तर काही चुकीचे ठरणार नाही. मुळात गरीब लोकांनी त्यांचे प्राथमिक शिक्षण कसेबसे पूर्ण करायचे आहे ते ही खिशातील एक ही रूपया खर्च न करता. मग शासन ही शिक्षणावर तरतूद करायचे तेवढेच एवढे सोडून त्यासाठी वेगळा खर्च कशाला करेल. शिक्षक ही त्यासाठी वेगळा खर्च का करावा म्हणून शाळा जसे असेल तसे त्याचा स्वीकार करून आपले शिकवण्याचे काम करतात. शिक्षक आपल्या पगारातील पैसा आपल्या घराला लावतील शाळेला पैसा लावून त्यांना काय मिळतो ? याचा विचार ते करणारच. एक ना एक दिवस शिक्षकांची बदली होते मग शिक्षक कसा विचार करेल ? स्वतः च्या खिशाला चाट लावून शाळा सुधारणा करावी, शाळेला रंगरंगोटी करायची, शाळा स्वच्छ आणि सुंदर करावे आणि लगेच पुढील वर्षी बदलीचा आदेश येऊन धड़कतो मग आपले बस्तान उचलून दुसऱ्या गावी जावे. पुन्हा त्या ठिकाणी शून्यातून विश्व निर्माण करावे. या सर्व बाबीचा विचार करून सरकारी शाळा दिवसेंदिवस घाणीच्या विळख्यात सापडल्यासारखे वाटत आहे. त्यास फक्त सरकार हा एकच वाली आहे. गावात एखादा कार्यक्रम आहे तर घ्या शाळेच्या खोल्या आणि करा कार्यक्रम साजरा. शासनाचा कोणता राष्ट्रीय कार्यक्रम आले की सर्वप्रथम दृष्टीस पड़ते ती म्हणजे शाळा. या व अश्या विविध कारणामुळे सरकारी शाळा नेहमी घाण होत राहतात आणि त्याची साफसफाई करण्याचे काम सेवक नसलेल्या शाळाप्रमुख म्हणजे मुख्याध्यापक शिक्षक यांना करावे लागते. मैदानाच्या स्वच्छतेपासून तर शौचालयाच्या स्वच्छतेपर्यन्तची कामे एकट्या शिक्षक कम मुख्याध्यापकाना करावे लागते. शाळा कितीही स्वच्छ ठेवावे असे जरी म्हटले तरी स्वच्छ राहुच शकत नाही. सरकारी शाळेतील शिक्षकांचे पगार मात्र वेळेवर होतात. पगार होताना त्यांना कसलीच अडचण निर्माण होत नाही म्हणून यांची शाळा जरी घाण दिसत असेल तरी यांची स्वतः ची घरे मात्र अगदी पॉश असतात. त्यांना तसा राहण्याचा हक्क आहे मात्र जेव्हा पॉश घरातून घाणीच्या साम्राज्य मध्ये असलेल्या शाळेत त्यांचे जीव कसे रमत असेल हा एक मोठा प्रश्न आहे ? याची सोडवणूक कोण करावी शिक्षक,

गावकरी की शासन यात ती शाळा मात्र आपले रूप बदलण्याच्या प्रतिक्षेत वाट पाहत उभी असते.

चित्राची एक बाजू अशी दिसत असेल तर चित्राची दूसरी बाजू सर्वांना आकर्षित करणारी आणि आखिव रेखीव असते.

त्याच राज्यात त्याच गावात दूसरे चित्र पाहिले की शाळेचा हवा वाटावे असे चित्र बघायला मिळते. आकर्षक ईमारत, रंगरंगोटी केलेल्या भिंती हे सर्व पाहून मन हरखून जाते. म्हणूनच प्रत्येक पालक या बाहेरून सुंदर दिसणाऱ्या शाळेकडे आकर्षित होतात. मात्र या शाळेची तुलना सरकारी शाळेसोबत करता येत नाही. त्याला कारणे भरपूर आहेत, जसे की, ही ईमारत म्हणजे स्वतः ची खाजगी मालमत्ता असते. त्यास मालक त्याच्या मनाला वाटेल तसे आकर्षक करू शकतो. आज शिक्षण हे एक व्यावसायिक रूप घेतले आहे आणि स्पर्धेत टिकून राहयचे असेल तर परिस्थिती पाहून काम करावेच लागते. नेमका हाच फरक सरकारी शाळेला लागू पडतो. सध्या लोक दुकान उघडल्यासारखे शाळा उघडत आहेत आणि दुकानदार जैसे गिरहाइक लोकांना आकर्षित करण्यासाठी रोशनाई करतो तसे रोशनाई करून पालकाना आकर्षित करत आहेत. मात्र यांना शिकविणारे शिक्षक कोणत्या दर्जाचे आणि पातळीचे असतात याचा विचार केला तर एक गोष्ट लक्षात येते की अध्यापन करण्याची पदवी किंवा पदविका नसणारे म्हणजे दहावी - बारावी पास-नापास मंडळी शिकविण्याचे काम करतात. यात त्या शाळा प्रमुखाची खूपच अक्कल हुशारी असते. ते म्हणजे ही मंडळी कमी पैशात उपलब्ध होतात त्यासाठी पात्र शिक्षक कशाला लागतात ? पहिलीच्या पोराला शिकवायला किती ज्ञान लागते ? असा विचार केल्या जातो म्हणून त्यांना कोणताही शिक्षक चालतो तो ही मजूरी प्रमाणे. बेरोजगारने होरपळून निघलेले तरुण मिळालेल्या मानधन वर काम करण्यास तयार होतात. कारण त्यांना काम हवे असते. कामाच्या शोधात असलेल्या अनेक युवकांना ही मंडळी आयते वापरून घेतात. तंत्रशुद्ध पध्दतीने यांना शिकविता येईल काय ? याची खात्री नसते. शाळा प्रमुखाची मात्र या शाळेत उत्तरोत्तर प्रगती होते कारण मुले भरपूर पैसा देऊन शिक्षण घेतात त्याबदल्यात येथील शिक्षकांना तूटपुंजी पगार दिल्या जातो आणि त्यामुळे येथील शिक्षक जो झोपडीत होता तो आपल्या झोपडीतच राहतो. त्याची आर्थिक प्रगती काही होत नाही. कधी कधी तर घरची भाकर खाऊन त्यांची शाळा सांभाळण्याची वेळ सुध्दा येते हे सत्य नाकारुन

चालणार नाही. शाळेला मिळत चाललेल्या यशात येथील शिक्षक मंडळीचा सिंहाचा वाटा असतो मात्र त्याचे फळ त्याला कधीच मिळत नाही हे ही खास आहे. येथील शिक्षक आपले सर्वस्व पणाला लावून काम करतो, शाळेला यशाच्या उच्च शिखरावर नेतो पण त्यांच्या पदरात काही पडत नाही, याची नेहमीच खंत त्यांच्या मनाला लागून राहते. ते बोलून दाखवू शकत नाही. कारण आजकाल शाळाप्रमुखाच्या विरोधात काही बोलले तर अंतर्गत त्रास दिला जातो किंवा लगेच बाहेरचा रस्ता दाखविले जाते. सरकारी व खाजगी शाळेचे चित्र जरी असे विसंगत दिसत असले तरी खाजगी शाळा बाहरसे सुंदर बदबू पूरा अंदर असण्याची शक्यता नकारता येत नाही आणि याउलट सर्वत्र घाण दिसणाऱ्या सरकारी शाळेतून सुध्दा चांगले विद्यार्थी घडू शकतात. जसे चिखलात कमळ उगवावे तसे एखादे कमळ येथे उगवते आणि त्याचा झगमगाट सर्वत्र पसरतो. म्हणून शाळेच्या बाह्य भागावरुन त्याचे गणित न मांडता खरोखर शाळेत किती चांगले शिकविले जाते आणि मुलांना किती चांगल्या प्रकारे संस्कार टाकल्या जातात ? या गोष्टीकडे जास्त लक्ष द्यावे असे वाटते.





# आई माझा गुरु

जीवनामध्ये गुरुचे स्थान अनन्य साधारण महत्वाचे आहे. गुरु विना ज्ञान मिळविणे अशक्य आहे,असे संत कबीर आपल्या दोहात सांगतात. लहानपणापासून ते वृध्द अवस्थेपर्यन्त आपणास गुरुची आवश्यकता भासते.जीवनाच्या प्रत्येक टप्प्यावर आणि प्रत्येक वळणावर आपणास गुरुची गरज भासते.गुरु म्हणजे कोण असतो ? गुरु म्हणजे मार्गदर्शक, गुरु म्हणजे ज्ञान देणारा, गुरु म्हणजे अज्ञानरूपी अंधारात दिवा लावून ज्ञानाचा प्रकाश पसरविणारा, गुरु म्हणजे दिशादर्शक. जेव्हा जेव्हा आपणास काही अडचणी निर्माण होतात, समस्या उद्भवतात तेंव्हा तेंव्हा आपणास जाणकार तज्ञ व्यक्तिकडे जावे लागते. म्हणजेच गुरुकडे जावे लागते. गुरु म्हणजे लघू नसलेला, लहान नसलेला. ज्याच्याकडे भरपूर ज्ञान व विद्या आहे तोच खरा गुरु. जे लोक गुरु होण्याचा मुखवटा धारण करतात ते एक ना एक दिवस उघडे पडतात आणि त्यांची पत घसरल्याशिवाय राहत नाही. आपले स्थान टिकविण्यासाठी गुरु लोकांना खुप मेहनत घ्यावी लागते.आपले ज्ञान सतत वाढवत ठेवावे लगाते.त्यासाठी नियमित अभ्यासाचा सराव करावा लागतो.

पूर्वीच्या काळात गुरुच्या घरी जाऊन आणि तेथेच राहुन शिक्षण घ्यावे लागत असे त्यास गुरुकुल पद्धत असे म्हटले जाते. त्याठिकाणी गुरु हा शिष्याना ज्ञान देण्याचे काम करीत असत आणि त्या विभागाचा राजा त्या गुरुचा यथायोग्य धनसंपत्ती देऊन स्वागत करायचा, ही पध्दत होती. ही गुरुकुल पद्धत आत्ता हॉस्टेलच्या स्वरुपात दिसून येते. मात्र त्यात गुरुकुल मध्ये जी आत्मीयता , प्रेम किंवा जिव्हाळा दिसून येत असे ते मात्र दिसून येत नाही.मधल्या काळात गावोगावी गुरुकुल ऐवजी शैक्षणिक संस्था म्हणजे शाळा उदयास आली आणि गुरुकुल मधील गुरु हे शिक्षक या नावाने ओळखले जाऊ लागले.विद्येचे घर अगदी आपल्या घराजवळ उपलब्ध झाल्यामुळे शिक्षण घेणारे आणि देणारे यांची संख्या वाढीस लागली. राजाच्या ठिकाणी शासन त्यांना दरमहा वेतन देत शासकीय कर्मचारी केले. असे हळूहळू गुरुचे पद व्यावसायिक होत गेले.

गुरुच्या व्यवसायात जैसेही लक्ष्मी, पैसा प्रवेश केला तैसे विद्या मंद गतीने दूर निघून गेली. कारण लक्ष्मी आणि सरस्वती सहसा एकत्र राहू शकत नाहीत. शाळेच्या बाबतीत सुध्दा असेच घडले शाळेत जैसे ही लक्ष्मीने प्रवेश केला तसे शाळेचेही रूप पालटले. पूर्वी शाळेतल्या गुरुजींना खुप मान सन्मान मिळायाचा, आदर मिळायाचा, लोक त्यांना सन्मानाने बोलायचे,मात्र आज तशी परिस्थिती नाही. आज गुरूजी बदलले,समाज बदललला, आणि परिस्थिती सुद्धा बदलली. आज कोणालाही शाळेतील गुरूजीची गरज भासत नाही. कारण त्यांच्या मुलांना शिकविण्यासाठी घरात संगणक, लॅपटॉप, टॅबलेट, मोबाईल, स्मार्ट फोन सारखे तंत्रज्ञान 24 तास त्यांच्या सेवेत उपलब्ध झाले आहेत. त्यामुळे त्यांना गुरुचे ज्ञान तोकडे वाटत असेल ? सोशल मिडियाच्या विविध माध्यमातून ज्ञानाची झरे वाहत आहेत. काही वर्षानंतर गुरुची संकल्पना मागे पडते की काय ?अशी भीती सुध्दा राहुन राहुन मनात येते.त्यासोबत अजुन ही या गोष्टीवर विश्वास वाटतो की गुरुशिवाय मनुष्याचे जीवन सफल होऊच शकत नाही. संगणका सारखे निर्जीव वस्तू बटण दाबता क्षणी माहिती देईल ;परंतु गुरु - शिष्य या दोन सजीवात ज्ञानाची जी देवाणघेवाण ते कदापि ही शक्य नाही. मुलांवर संस्कार टाकण्याचे काम निर्जीव वस्तू नक्कीच करू शकणार नाही, त्यासाठी सजीव व्यक्तीच पाहिजे. मनुष्याच्या जीवनात गुरुचे पहिले स्थान हे आपणास जन्म देणाऱ्या आईला दिले जाते. पृथ्वीवर जन्माला येण्यापूर्वी पासून आईचा संबंध येतो. आई आपल्या बाळाला नऊ महीने नऊ दिवस गर्भात वाढवून मोठी करते. गर्भसंस्कार सुध्दा जीवनात मोलाचे काम करतात. आई आपल्या मुलांवर वेगवेगळया प्रकारे संस्कार करते आणि मुलभुत ज्ञान सुध्दा देते. ऐकणे आणि बोलण्याची क्रिया आईने जर शिकविली नसती तर त्या मुलाचा काय विकास होऊ शकतो ? याची आपण कल्पना करू शकतो. समाजामध्ये आणि शाळेत पाऊल ठेवण्यापूर्वी प्रत्येक मुलांना आई ज्ञानाचे धडे देऊन तयार करते. म्हणूनच आई माझा गुरु आई कल्पतरु असे एका कवीने आपल्या कवितेत म्हटले आहे.इतर सर्व गुरुपेक्षा आई ही अत्यंत महत्वाची आद्य गुरु होय. आपले मूल चांगले संस्कारी, हुशार आणि सुजाण नागरिक म्हणून समाजात जगावे असे वाटत असेल तर प्रत्येक आईने तज्ञ गुरुच्या भूमिकेतून आपल्या मुलांना घडविण्याचा प्रयत्न करावा. महाराष्ट्र राज्याचे आणि हिंदवी राज्याचे संस्थापक छत्रपती शिवाजी महाराज यांना त्यांची आई राजमाता जिजाऊ यांनी घडविले म्हणून ते लहान वयात सुध्दा खुप मोठा पराक्रम करून दाखवू

शकले. परमपूज्य सानेगुरूजी सारखा हळव्या मनाचा आणि आईच्या हृद्याचा व्यक्ती आपणास लाभला ते फक्त त्यांच्या आईमुळेच, हे त्यांच्या श्यामची आई पुस्तकातुन पानोपानी दृष्टिस पडते. अशियम्मा सारख्या मातेच्या संस्कारामुळे ए पी जे अब्दुल कलाम सारखे मिसाईल मैन देशाला राष्ट्रपती म्हणून मिळाले.आज गुरुपौर्णिमेच्या दिवशी आपल्या गुरुला वंदन तर करायचेच, शिवाय आपल्या आद्य गुरुला म्हणजे आईला ही वंदन करण्यास विसरून चालणार नाही.



# संस्काराचे महत्व *

एकविसावं शतक हे ज्याप्रमाणे संगणकाचे युग म्हणून ओळखले जाते तसे ते धावपळीचे सुध्दा युग आहे. जो तो मनुष्य येथे एखाद्या यंत्राप्रमाणे आज काम करीत आहेत. भरपूर पैसा कमावणे आणि त्यातून आपल्या लेकरांना सुखी व आनंदी ठेवण्यासाठी आई - वडील हे दोघेही विविध क्षेत्रात नोकऱ्या करीत आहेत. घरातील चूल आणि मूल सांभाळणाऱ्या महिलांनी देखील कुटुंबाच्या प्रगतीसाठी घराबाहेर पाऊल ठेवले आहे. हा बदल देशाच्या प्रगतीसाठी निश्चितच अभिमानास्पद आणि प्रेरणादायक आहे ; परंतु या बदलामुळे घरात काही समस्याचाही जन्म झाला आहे, याकडे दुर्लक्ष करून चालणार नाही. महिला नौकरी करू नयेत किंवा त्यांनी फक्त घरचेच काम करावीत या विचारधारेत आम्ही नाही. परंतु दोघेही नौकरी करणाऱ्या कुटुंबात तणावाचे वातावरण दिसून येते, हे सत्य स्वीकारावे लागेलच. दोघेही नौकरी करणाऱ्या ज्या घरात पुरुष आणि स्त्री या दोघांचे योग्य समायोजन होते तेथे शांतता सुध्दा दिसून येते हे ही खरेच आहे. पण ते फारच अल्प काळ टिकून राहण्याची भीती सुध्दा असतेच. या कामाच्या व्यापात आणि धावपळीत आपल्या पोटच्या मुलांवर संस्कार करायचे राहून चालले आहे असे काही ठिकाणच्या अनुभवावरून वाटते. आपल्या लेकरांना एखाद्या दाईच्या हाती सोपवले जाते. ती काय संस्कार करणार ? ज्यांच्या जवळ खूप पैसा आहे त्यांना वाटते की पैशाच्या बळावर सर्व काही मिळविता येते परंतु त्यांना हे माहित नाही की पैशाच्या बळावर संस्कार मिळविता येणार नाही. संस्कार हा जीवनाचा अनमोल ठेवा आहे आणि त्यांची रुजवण बाळ गर्भात असल्यापासून करावे लागते. गर्भसंस्कार सुध्दा अत्यंत महत्वाचे आहे. गरोदर महिलांनी कसे वर्तन ठेवायला हवे, मन प्रसन्न ठेवायला हवे, स्वतःला दगदग पासून दूर ठेवावे, चांगल्या गोष्टी, कथा व गाणी ऐकायला हवे या सगळ्या गोष्टी जाणीवपूर्वक करायला हवे.  बालपणी मुलांवर जे संस्कार होतात ते आयुष्यभर त्याच्या सोबत असतात. चिरकाल टिकणारे संस्कार योग्य प्रकारे झाले तर त्याचे अनुकूल परिणाम पहावयास मिळतात अन्यथा वाईट परिणाम तर कोणालाही पहावे सुध्दा वाटत नाही कारण त्याचा शेवट खूपच भयानक असतो. गर्भपासून ते

मूल समजदार होईपर्यंत त्यांची काळजी घेणे अत्यावश्यक आहे. त्यामुळे वयाच्या दहाव्या वर्षपर्यंत मुलांकडे विशेष लक्ष देऊन त्यांच्यावर चांगले संस्कार होतील याकडे प्रत्येक पालकांनी ध्यान ठेवणे गरजेचे आहे. यांसाठी बालवाडी, अंगणवाडी, शाळा आणि विद्यालयात परिपाठाचे नियोजन केल्या जाते. ज्यातून मुलांवर संस्कार टाकण्याचे काम केल्या जाते. आपले पारंपारिक सण वा उत्सव यातून मुलांवर सामाजिक सोबत कौटुंबिक संस्कार टाकता येतात म्हणून असे सण साजरे करतांना त्यातून मुलांवर संस्कार कसे टाकता येतील याचा विचार करून कार्यक्रम साजरे केल्यास तेथे एक वेगळाच आनंद अनुभवास येतो. त्याचप्रमाणे मुलांना याच वयात स्वावलंबनाची शिकवण ही द्यायला हवे. जसे की घरात इतरत्र पडलेल्या वस्तू उचलून जागेवर ठेवणे, अंथरुण व पांघरूणची घडी करून ठेवणे, पाणी भरण्यासाठी व घराची झाडलोट करण्यासाठी आईला मदत करणे, घराबाहेर बाबांच्या कामात मदत करणे यांसारखी कामे दिसतात लहान पण खूप महान कार्य करून जातात. म्हणूनच लहानपणापासून दिलेले हे स्वावलंबनाचे धडे मुलांना भावी आयुष्यात निश्चितच उपयोगी पडतील. नवरा बायको यांनी घरात वावरत असताना प्रेमाने आणि आपुलकीने वागावे. लहान सहान वाद किंवा भांडण करणे यांसारख्या बाबींचा परिणाम मुलांच्या मनावर होतो. लहान मुले अतिशय संवेदनशील असतात प्रत्येक कृती चे ते सुक्ष्म निरीक्षण करतात आणि त्याप्रमाणे वागण्याचा प्रयत्न करतात. लहान वयात मुलांवर योग्य संस्कार करणे ही एकप्रकारे हिऱ्यांच्या खड्यावर केलेली प्रक्रियाच आहे. या संस्कारामुळे त्यांचे जीवन हिऱ्यांप्रमाणे प्रकाशमान होऊन चमकत राहते.

# बालमजूरी कशी संपेल ?

बालपण ही प्रत्येक व्यक्तींच्या आयुष्यातील एक महत्वाचा टप्पा आहे. परंतु सर्वांचेच बालपण सुखांत, आनंदात किंवा मजेत जातात असे नाही. संत तुकाराम महाराज यांनी बालपण देगा देवा, मुंगी साखरेचा रवा असे म्हटले आहे. पण समाजात वावरताना जे चित्र नजरेस पड़ते ते फारच भयानक आहे. सकाळी सूर्यकिरण धरतीवर पडत ही नाही की घराबाहेर एक चिरकणारा आवाज कानावर पडतो. त्या आवाजानेच जाग येते म्हटले तरी काही वावगे नाही. " ताई, शिळं काही असेल तर वाढ. " असे ओरडणारे पोरं त्यांचं बालपण काय म्हणत असेल ! आपल्या पोटाचा प्रश्न सोडविण्यासाठी हे पोरं दारोदारी भीक मागत फिरतात आणि मिळालेली भीक आपल्या कुटुंबासह वाटून खातात. सूर्य डोक्यावर चढायला लागला की हेच पोरं उकिरडे शोधत फिरतात. मिळेल ती वस्तू आपल्या थैलीमध्ये भरतात आणि सर्व वस्तू नेऊन भंगार वालेल्या विकून मिळेल त्या पैशात काही खरेदी करून खातात. यांना बालमजुरी म्हणावे काय ? हा त्यांच्या पोटाचा प्रश्न असतो ज्याची सोडवणूक स्वतः त्यांनाच करावी लागते. शिक्षण नावाची वस्तू तर त्यांच्यापासून कोसो दूर असते. शाळा म्हणजे काय असते ? या बाबींचे त्या मुलांना सोडा घरातील कोणालाच त्यांची कल्पना नसते आणि शाळेत आपणाला शिकण्याची संधी मिळते याची सुध्दा त्यांना कल्पना नाही हे त्यांना प्रत्यक्षात भेटल्यावर लक्षात येते. शाळाबाह्य मुलांचे सर्वेक्षण करण्याचे शासनाने ठरविले. त्यानुसार सर्वेक्षण चे आराखडे व वेळापत्रक तयार करण्यात आले. संपूर्ण गाव, वाडी, तांडे, शहरातील गल्ल्या सर्व सर्वेक्षण केल्यावर शाळाबाह्य संख्या म्हणावी तेवढी निघाली. शाळाबाह्य आणि बालकामगार हे एकमेकास पूरक आहेत. जे बालकामगार आहेत ते शाळाबाह्य आहेत. किंवा शाळाबाह्य राहण्यामागे काम करणे ही त्यांची मजबूरी आहे. शाळेत अनुपस्थित राहाणाऱ्या मुलांच्या घरी शिक्षक जेंव्हा कारणे समजून घेण्यासाठी भेट देतात तेंव्हा पालकांचे उत्तर ऐकून हसावे की रडावे हेच कळत नाही. काही पालक म्हणतात की शेताकडे बघायला कोणीच नाही. आज मजूरदार

मिळणे अवघड झाले किंवा मजूरदाराला देण्याएवढे पैसे नाहीत त्यामुळे याला सोबत घेतो. उद्या नक्की पाठवितो शाळेला असे म्हणून शिक्षकाची बोळवण केली जाते. पण त्या मुलांची उद्या कधीच उजाडत नाही आणि तो शाळेला येत नाही. यांस बालमजुरी म्हणावे का ? घरातील लहान भावंडाची सांभाळ करणे, स्वयंपाक करणे, धूणी भांडी करणे इत्यादि कामासाठी मुली मधुनच शाळा सोडतात हे प्रत्यक्षात भेट दिल्यावर समजते. शेतात काम करणाऱ्या किंवा मजुरी करणाऱ्या लोकांसाठी थोडीशी मदत सुध्दा आभाळाएवढी मोठी वाटते. आई वडीलांच्या कामात मदत करणाऱ्या मुलांना बालमजूर म्हणता येईल काय ? त्यांना शिक्षणापासून वंचित ठेवणाऱ्या पालकांवर आजपर्यंत कुठे करवाई झाल्याचे ऐकिवात नाही. कारण घरच्या कामात मदत करणे हे बालमजुरी या व्याख्येत बसत नाही असे वाटते. मात्र ती मुले कायमची शिक्षणापासून दूर होतात, शाळाबाह्य होतात, त्यांचे जीवन अंधकारमय होते यावर काही पर्याय मिळेल काय ?

यानंतर आपण अश्या क्षेत्राकडे वळणार आहोत. ज्यांना शाळेचा अजिबात गंध नाही. पालकांना शिक्षणाचे महत्व माहीत नाही, ते कधी शाळेलाच गेले नाहीत ते आपल्या मुलांना काय शाळेत पाठवणार ?

अश्या लोकांच्या घरी जेंव्हा सर्वेक्षण करणारी मंडळी पोहोचली तेंव्हा त्यांना काय अनुभव आला असेल ? फारच विचित्र अनुभव याठिकाणी मिळाला. यापूर्वी सर्वेक्षण करणारे कर्मचारी एक दोन वेळा येऊन गेले होते. त्यामुळे तिसर्यांदा जेंव्हा सर्वेक्षण करणारी मंडळी त्यांच्या गल्लीत गेल्याबरोबर पालकांचा मोठा आवाज ऐकू आला " शाळेत घेऊन जाणारी माणसे आलीत रे पोरं हो लपुन बसा " खूपच आश्चर्य वाटलं की हे माणसे असे का बोलत आहेत. मागील वेळेस असाच एक माणूस आला आणि त्यांनी येथील पाच - सहा पोरं घेऊन गेला. त्यांना माहीत नाही की ती पोरं आज तालुक्याच्या किंवा जिल्ह्याच्या शाळेत शिकत असतील पण त्यांना वाटते की ही माणसे आपले पोरं घेऊन जात आहेत आणि त्यांच्या पोटाचा प्रश्न अनुत्तरित राहत होता असे त्यांच्याशी संवाद केल्यावर कळले. तेथे शालेय वयातील बरीच मुले दिसत होती पण पालक सहकार्य करीत नव्हते त्याठिकाणी काय करता येणार ? हा एक मोठा प्रश्न आहे. मागे काही दिवसाखाली एक बातमी वाचण्यात आली की फासेपारधीच्या मुलांसाठी मतीन भोसले नावाचा व्यक्ती प्रश्नचिन्ह नावाच्या माध्यमांतून मुलांचे शिक्षण पूर्ण करीत आहे.

ना सरकारची मदत ना त्यांच्याजवळ गडगंज संपत्ती आहे. फक्त समाजातील काही दानशूर व्यक्तीच्या मदतीने ते प्रकल्प राबवित आहेत. मूठभर धान्य, एक वही, एक पेन एवढीच आपली मदत या भटक्या मुलांच्या जीवनात प्रकाश पसरू शकते. या मुलांना आपल्या नियमित शाळेत प्रवेश दिल्यानंतर ते शिकणार नाहीत हे ही सत्य आहे. याचा सुध्दा अनुभव एका शाळेत आला. एका भीक मागणाऱ्या पोराला वयानुसार शाळेत प्रवेश देण्यात आले. पण त्यांच्याजवळ कोणीच बसायला तयार होईना. त्याच्या अंगाचा पूर्ण वास येत असल्यामूळे ती मुले त्यांना दूर करीत होती. दुपारी जेवणाच्या वेळी सुध्दा तोच अनुभव आला. मग काय दोन तीन दिवसांनी ती मुले स्वतःहून शाळेत न येण्याचा निश्चय केला.

शिक्षणातून समानतेचे धडे शिकविले जावे हे अगदी सत्य आहे. मात्र मुलांना जे डोळयांना दिसते त्यात काय बदल करता येणार ? त्याऐवजी प्रश्नचिन्ह सारखे प्रकल्प राबविण्यासाठी काही संस्था पुढे येणे गरजेचे आहे. आणि समाजातील लोकांनी सुध्दा अश्या प्रकल्पाला सढळ हाताने मदत करणे गरजेचे आहे. एखाद्या देवाला रक्कम दान केल्याने खरंच पुण्य मिळते की अश्या सेवाभावी संस्थेला मदत केल्याने पुण्य मिळते याचा विचार करण्याची आज खरी वेळ आहे. देवाच्या नावाने संपूर्ण गावाला भंडारा खाऊ घालण्यापेक्षा या गरीब लोकांच्या पोटापाण्याचा प्रश्न सोडविली आणि त्याना खाऊ दिले तर जास्त पुण्य मिळेल. एखाद्या भूखेल्या व्यक्तीला जेऊ घातल्यानंतर जे समाधान मिळते कदाचित ते लाख रू देवाला दान केल्या नंतर ही मिळणार नाही. त्यामूळे समाजातील दानशूर व्यक्तीनी यावर एकवेळ जरूर विचार करावे असे वाटते. हॉटेलात, वीटभट्टीवर, किंवा इतरत्र काम करणारे चौदा वर्षांखालील मुले बालकामगार म्हणून आपणांस ठळकपणे दिसून येतात मात्र वर उल्लेख केलेले अशी बरीच मुले आहेत जे की अप्रत्यक्षरित्या बालकामगारच नव्हेत का ? अश्या बालकामगार बालमजुरांची संख्या भरपूर आहे. यांवर काही उपाययोजना करता येईल काय आणि बालमजुरी कशी संपविता येईल याचा प्रशासनासह समाजातील सर्व घटकांनी गंभीरतापूर्वक विचार करणे अगत्याचे आहे. बालमजुरी किंवा बालकामगार आणि शाळाबाह्य मुले हा कधीच न संपणारा विषय आहे. तसेच ही समस्या फक्त भारतातच नव्हे तर जगाला भेडसावणारी समस्या आहे.

# शिक्षण : जीवन विकासाचे साधन *

शिक्षणाने मानवी जीवनाचा विकास होतो. आपल्या जीवनात शिक्षणाचे महत्त्व अनन्यसाधारण असे आहे. कारण, शिक्षण हे कौटुंबिक, आर्थिक, सामाजिक व मानसिक परिवर्तनाचे एक महत्त्वपूर्ण साधन आहे. मानवी जीवनाच्या विकासाचा तो पाया आहे.चांगली सुसंस्कृत, चारित्र्यसंपन्न व सृजनशील पिढी फक्त शिक्षणातूनच घडविता येते. शिक्षणातून माणूस आपल्या बुध्दीच्या आधारे उत्तम विचार करायला लागतो. खरे काय आणि खोटे काय यांचा छडा लावू शकतो.म्हणूनच शिक्षणातून माणूस स्वत:सोबत कुटुंबाचा आणि समाजाचादेखील विकास करू शकतो

महात्मा ज्योतिबा फुले शिक्षणाविषयी बरेच काही सांगितले आहे. त्यांनी नुसते सांगून थांबले नाही तर तळागाळातील लोकांना शिक्षणाचे द्वार उघडण्यासाठी पुण्यातील भिडेच्या वाड्यात मुलींसाठी पाहिली शाळा सुरू केली. शिक्षणाचा प्रचार आणि प्रसार यांसाठी त्यांनी आपले आयुष्य वेचले. कारण शिक्षणाशिवाय लोकांचा विकास होणे शक्य नाही हे जाणून होते.

विद्येविना मती गेली, मतिविना नीती गेली,

नीतिविना गती गेली, गतिविना वित्त गेले,

वित्ताविना शूद्र खचले, इतके अनर्थ एका अविद्येने केले,

असे त्यांनी शिक्षणाचे महत्व सांगताना स्पष्ट केले आहे. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी तर शिक्षणाला वाघिणीचे दुध असे संबोधिले आहे. यावरून आपणाला जीवनात शिक्षणाचे किती महत्व आहे हे कळून चुकेल.

माणसांना परमेश्वराने दोन डोळे दिले आहेत ज्याच्या आधारे तो संपूर्ण सृष्टी पाहू शकतो. मात्र या दृष्टीला ज्ञानाची जोड नसेल तर पाहत असलेल्या दृष्टीमध्ये चांगली सृष्टी बघायला मिळणार नाही आणि बघितलेले चिरकाल टिकून राहणार नाही. प्रसिद्ध विचारवंत

म्हणतो की, विस्मृतीमध्ये गेलेले आठवणे तेच खरे शिक्षण. ज्ञान मिळविण्यासाठी शिक्षणाची अत्यंत आवश्यकता असते. शिक्षणाशिवाय कोणत्याही विषयाचे सखोल ज्ञान मिळत नाही. आपणांस एखाद्या विषयांत सखोल ज्ञान मिळवायचे असेल तर त्यासाठी त्यांचे शिक्षण ध्यासपूर्वक होणे गरजेचे आहे.

शाळेतूनच विद्यार्थ्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा पाया शिक्षणातून रचला जातो. शाळेतून शिकविण्यात आलेल्या अनेक संस्कारक्षम मुल्यांच्या आधारावरच मुलांचे पुढील जीवनातील यश अवलंबून असते. म्हणूनच शाळेतूनच देशाचे भवितव्य घडते असे म्हणणे चुकीचे ठरणार नाही. प्रत्येकाच्या जीवनात शालेय शिक्षणाचे खूप महत्व आहे. तुमच्यातील जे काही सर्वोत्तम आहे ते प्रकट करणे म्हणजे खरे शिक्षण. स्वामी विवेकानंद म्हणतात की माणसांतील पूर्णत्वाचा आविष्कार म्हणजे शिक्षण होय. आपल्या स्व ची ओळख या शिक्षणातून होते. आजपर्यंत जे शिकले नाहीत ते काय जगले नाहीत काय ? ते जगले पण त्यांच्या जगण्याला काही एक अर्थ नव्हता. जन्मलास म्हणूनी जगलास आणि काळ येताच मेला, तुझ्या या जीवनी काय अर्थ राहिला ? या ओळीनुसार. आपण का जगतो याचे उत्तर ज्याला मिळेल त्यांचे जीवन सार्थ होईल. त्यासाठी शिक्षणाची नितांत आवश्यकता आहे. आचार्य विनोबा भावे म्हणतात की, शिक्षण कोणतीही गोष्ट नव्याने निर्माण करण्याचे व अस्तित्वात आणण्याचे कार्य करीत नाही. सुप्त, चैतन्य व निद्रिस्त शक्ती जागृत करण्याचे साधन म्हणजे शिक्षण. आपले जीवन चैतन्यमय आणि आनंदी करण्यासाठी शिक्षणाशिवाय पर्याय नाही.

शिक्षण म्हणजे माणसाच्या जन्मापासुन मरणापर्यंत चाललेली शिकण्याची प्रक्रिया आहे जी की अविरतपणे चालूच असते. थांबला तो संपला असे जे म्हटले जाते ते या शिक्षण प्रक्रियेला लागू होते. ईश्वराशिवाय कोणीही परिपूर्ण नाही. त्यामूळे आपण किती ही ज्ञानी असले तरी आपल्यापेक्षा वरचढ जगात कोणी तरी आणि कुठे तरी ज्या वेळी भेटतो त्यावेळी आपण नाराज होतो स्वतः ला स्वतः ची लाज वाटायला लागते. त्यामूळे प्रत्येक नवीन बाब आत्मसात करण्यासाठी शिक्षण घेणे आवश्यक आहे अन्यथा आपणांस वाळीत टाकण्याची शक्यता नाकारता येते नाही. त्याचमुळे आपले व आपल्या परिवारातील आणि शेजारील व्यक्तीचे जीवन सुधारण्याचे एकच साधन आहे आणि ते म्हणजे शिक्षण.

# शाळेचा कणा : मुख्याध्यापक *

ज्ञान हे पैशापेक्षा श्रेष्ठ आहे, कारण पैशाचे रक्षण तुम्हांला करावे लागते. परंतु ज्ञान तुमचेच रक्षण करते आणि हे ज्ञान शिक्षणातून मिळते. म्हणूनच म्हटले जाते की, शिक्षण हा माणसाचा तिसरा डोळा आहे. आपल्याजवळ असलेल्या दोन डोळयांनी फक्त दृश्यचित्र बघितल्या जाते. परंतु आपण शिक्षण घेऊन ज्ञानी झाला असाल तरच जे बघतो त्याची इत्यभुत माहिती आपल्या मेंदूकडे पाठवितो. अन्यथा नुसते चित्रच मेंदूकडे जाते आणि नुसते चित्र जास्त काळ स्मरणात राहत नाही. याबाबतीत प्रसिद्ध विचारवंत म्हणतो की, विस्मरण झालेल्या वस्तुची स्मृती म्हणजेच ज्ञान होय. अगदी जन्मल्यापासून ते मृत्यूपर्यंत व्यक्तीला विविध माध्यमातून ज्ञान मिळत राहते आणि व्यक्ती त्या मिळविलेल्या ज्ञानाच्या बळावर समृद्ध होतो, प्रगल्भ होतो आणि समजूतदार सुध्दा होतो. त्यातल्या त्यात लहान मुलांना एका चांगल्या दिशेने ज्ञान मिळावे यांसाठी शाळेतून शिक्षण देण्याचा पर्याय निवडला जातो. लहान मुलांची कुटुंब ही जरी पहिली शाळा असली तरी शाळा असे ठिकाण आहे ज्या ठिकाणी मुलांना अक्षर आणि अंक ज्ञानासोबत विविध विषयाचे ज्ञान दिल्या जाते. शाळेला विद्यालय किंवा विद्येचे घर म्हटले जाते. शाळा हे संस्काराचे महत्वाचे केंद्र आहे. अगदी कोवळया वयात म्हणजे सहा वर्षे पूर्ण झाल्यावर ते शाळेत येतात आणि 14 व्या वर्षी प्रगल्भ आणि हुशार होऊन बाहेर पडतात. विनोबा भावे म्हणतात की, शिक्षण हा यशस्वी जीवनाचा पाया आहे. त्यातल्या त्यात प्राथमिक शिक्षण हे प्रत्येकाच्या जीवनात फार महत्वाची भूमिका बजावतात. कारण संपूर्ण शिक्षण प्रणाली ही प्राथमिक शिक्षणावरच अवलंबून असते. पायाच जर कच्चा राहिला तर त्यावरील सर्व इमारती कमकुवत ठरतात. प्राथमिक शाळेत तीन घटक महत्वाची भूमिका बजावतात. पहिले म्हणजे विद्यार्थी, दूसरे म्हणजे शिक्षक आणि तिसरे ज्याची फारच महत्वाची भुमिका असते शाळेमध्ये तो म्हणजे मुख्याध्यापक. मुख्याध्यापक हा कोणत्याही शाळेचा कणाच असतो. शाळेचा प्रमुख आधारस्तंभ म्हणजे मुख्याध्यापक.

पायलटविना विमान उडविता येत नाही, ड्रायव्हरशिवाय गाडी चालविता येत नाही. अगदी तसेच मुख्याध्यापकाविना शाळा चालविताच येत नाही. त्यामुळेच शाळेच्या विकासामध्ये मुख्याध्यापकाची भुमिका अत्यंत महत्वाची आणि आवश्यक आहे. आज ज्या शाळेवर मुख्याध्यापक नाहीत किंवा मुख्याध्यापकाची पदे इतर शिक्षकाकडे सोपविण्यात येते तेंव्हा त्या शाळांची अवकळा पाहताक्षणी ओळखू येते. एखाद्या घरात कुटुंब प्रमुखावर जी जबाबदारी असते, तीच जबाबदारी मुख्याध्यापक पदावर असते. कुटूंबाचा विकास आणि प्रगती साधण्यासाठी कुटुंबप्रमुखाला जास्त त्रास सहन करावा लागतो. पण जेंव्हा कुटुंबातील एखादी व्यक्ती यशस्वी होते किंवा प्रसिध्दी मिळविते त्यावेळी त्यांच्यासोबत कुटुंबप्रमुखाचे नावसुध्दा प्रसिध्दीस येते. असेच जवळपास शाळा आणि मुख्याध्यापकाचे आहे. सांघिक खेळात सर्व खेळाडूंच्या खेळण्याचा संघावर अनुकूल किंवा प्रतिकूल परिणाम बघायला मिळतात. खेळ चांगला झाला की वाईट यांस संपूर्णपणे कर्णधारावर जबाबदारी टाकली जाते. कर्णधार संघाचे हित लक्षात घेऊन निर्णय घेतला तर सामन्यात विजय मिळतो. मुख्याध्यापकाची सुध्दा जवळपास या कर्णधारासारखी अवस्था आहे. शाळेचा विकास साधणे ही सांघिक कामगिरी आहे. त्यात एकटा मुख्याध्यापक किंवा शिक्षक काहीच करू शकत नाही. शाळेच्या विकासात मुख्याध्यापक हा महत्वाचा घटक आहे. शाळेला विकासाच्या उंचीवर नेऊन ठेवायचे असेल तर सर्वात पहिल्यांदा मुख्याध्यापक पद शाळेत रिक्त असता कामा नये आणि कार्यरत मुख्याध्यापक हा उपक्रमशील, उद्योगी, आणि हुशार असायलाच हवे. कारण शाळेतील मुलांना घडविण्यासाठी काय करता येईल ? याचे एक नियोजन मुख्याध्यापकाच्या डोक्यात असणे आवश्यक आहे. संपूर्ण शाळा मुख्याध्यापकाच्या देखरेखीखाली तयार होत असते. कल्पक बुध्दिमत्ता, उपक्रमशील आणि वर्षभरातील सांस्कृतिक कार्यक्रम डोळयांसमोर ठेवून मुलांमध्ये शाळेविषयी आकर्षण तयार केल्यास त्या मुख्याध्यापकाला नक्कीच यश मिळते. त्याऐवजी मुख्याध्यापकाने कसल्याच प्रकारचे नियोजन केले नाही तर ती शाळा थोड्याच दिवसांत रसातळाला गेलेले दिसून येते. कितीही प्रयत्न केले तरी त्या शाळेला गतवैभव परत मिळणे कठीण बनते. निष्क्रिय मुख्याध्यापक म्हणजे असून अडचण नसून खोळंबा होय. शाळेत मुलांना पुस्तकी ज्ञानासोबत नैतिक मूल्यांची शिकवण मिळणेसुध्दा गरजेचे आहे. पुस्तकं मुलांना ज्ञानी बनवितात तर नैतिक मूल्ये त्यांना माणूस घडवितात. देशाचे भविष्य शाळेत घडविले जाते. याठिकाणी त्यांच्यावर उत्तम संस्कार होणे गरजेचे आहे. जाणूनबुझुन किंवा शिकविल्याने कोणावर संस्कार करता येत नाही, ती विकत घेण्यासारखी वस्तु ही नाही. ती

नकळतपणे रोजच्या चालण्याबोलण्यातून होत असते. त्यासाठी शाळेची काही नियमावली तयार करणे आणि त्याची अंमलबजावणी करण्याचे काम अर्थातच मुख्याध्यापकाचे असते. संपूर्ण विद्यार्थी, शिक्षक आणि शाळेची काळजी शाळेचा प्रमुख या नात्याने मुख्याध्यापकाना घ्यावीच लागते. त्यातल्या त्यात शाळेला मुख्याध्यापकच नसेल तर त्या शाळेची धुरा सांभाळणार कोण ? हा प्रश्न उपस्थित होतो.

या जिल्हा परिषदेच्या माध्यमिक शाळातून आज मोठ्या संख्येने गोरगरीब, शेतकरी, शेतमजुर, कष्टकऱ्याची मुले शिक्षण घेत आहेत. माध्यमिक शाळेत पाचशे ते हजार विद्यार्थी शिक्षण घेत असतात आणि वीस ते चाळीस शिक्षक शिकविण्याचे काम करीत असतात. या सर्वावर नियंत्रण ठेवण्यासाठी एक कार्यक्षम मुख्याध्यापकाची अत्यंत गरज असते. शाळेला मुख्याध्यापकच नसेल तर त्या शाळेचे व्यवस्थापन सुरळीत कसे चालणार व विद्यार्थ्यांची गुणवत्ता कशी वाढेल ?

राज्यात जिल्हा परिषदेच्या एकूण 356 माध्यमिक शाळा आहेत. त्यापैकी 299 शाळा मराठवाडा मध्ये आहेत. त्यात जिल्हानिहाय दिलेले राजपत्रित मुख्याध्यापक पद रिक्त असल्याचे आकडे आश्चर्यचकित केल्याशिवाय राहत नाही. औरंगाबाद जिल्ह्यात 52 पदे मंजूर असून फक्त 3 पद कार्यरत आहेत, जालना मध्ये 29 पैकी 2, हिंगोली 18 पैकी 4, नांदेड 48 पैकी 3, उस्मानाबाद 46 पैकी 3, बीड 32 पैकी 4, लातूर 45 पैकी 1 आणि परभणी जिल्ह्यात 29 मुख्याध्यापक पदापैकी एकही पद भरण्यात आले नाही, असॆ 299 पैकी 20 पदेच एकूण मराठवाडा मध्ये भरण्यात आल्याची माहिती शिक्षक आ. विक्रम काळे यांनी विधानसभेत लक्षवेधीच्या माध्यमांतून प्रश्न उपस्थित करून या गंभीर विषयाकडे सरकारचे लक्ष दिली वेधले. त्यावर शालेय शिक्षणमंत्री मा. ना. विनोद तावडे यांनी पुढील शैक्षणिक वर्ष प्रारंभ होण्यापूर्वी राजपत्रित मुख्याध्यापकाची पदे भरण्यात येईल असॆ उत्तर दिले. पण खरोखरच सरकारला या माध्यमिक शाळांची काळजी असेल तर येत्या शैक्षणिक वर्ष माध्यमिक शाळासाठी अच्छे दिन घेऊन येईल ? अन्यथा पुन्हा ये रे माझ्या मागल्या प्रमाणे होईल अशी शंका निर्माण होते.

# स्वच्छता आणि आरोग्य

स्वच्छता हा माणसाच्या जीवनाचा एक अविभाज्य भाग आहे. ह्या एका गुणा मुळे माणसाचे जीवन सुंदर बनते. ही एक सवय आहे. स्वच्छता म्हटली की आपल्या समोर अनेक बाबी उभ्या राहतात. स्वच्छता कश्याकश्याची आणि कशी ठेवायाची हा मोठा प्रश्न आपल्या समोर असतो. स्वच्छतेची सुरुवात ही स्वतः पासून म्हणजे स्वतःच्या शरीर स्वच्छते पासून करावी. सकाळी उठल्यापासून तर रात्री झोपेपर्यंत आपल्या स्वच्छते विषयी आपण जागरूक राहून कार्य केल्यास आपली छाप इतरावर निश्चितपणे पडते. लहानपणी सकाळी उठले की आई मुलांच्या मागे राहून दात स्वच्छ घास, चूळ भर आणि हात-पाय स्वच्छ धुउन घेण्याविषयी तगादा लावते. कारण स्वतः च्या स्वच्छतेची सुरुवात ही याच क्रियेपासून होते. लहानपणी लागलेली स्वच्छतेची चांगली सवय त्यांच्या सोबत आयुष्यभर राहते ही तर चांगली गोष्ट आहेच यासोबत आपल्या दाताचे आयुष्यही वाढते. दाताचे विकार होत नाही. आपल्या जीवनात दाताचे काय महत्त्व आहे हे दात नसणाऱ्या लोकांना विचारून पहिल्याशिवाय कळणार नाही. स्नान करणे ही त्या नंतरची अत्यंत महत्वाची क्रिया. बहुतांश व्यक्ती स्नान ही क्रिया महादेवाला पाणी घातल्यासारखे डोक्यावरुन पाणी ओततात त्यामुळे अंगाची सफाई होत नाही. साबणाचा वापर करीत अंग घासुन स्नान केल्यास आपल्या अंगाचा वास येत नाही. विशेष म्हणजे त्वचा रोगापासून आपण दूर राहू शकतो. दररोज स्वच्छ कपडे परिधान करून बाहेर पडण्याची आपली सवय इतराना त्रासदायक ठरत नाही. मळके कपडे अंगावर असतील आणि प्रवासात कुठे तरी आपण बसलात तर कपड्याच्या दुर्गन्धी मुळे कुणी आपल्याजवळ बसत नाही. शाळेत तर याचा फार वेगळा अनुभव येतो. त्यामुळे घराबाहेर जाताना स्वच्छ कपडे एक तर आपणास शोभुन दिसते आणि आपल्यामुळे इतराना त्रास ही होत नाही. म्हणून स्वच्छ कपडे वापरण्याची सवय शाळेत असताना जी लागते ती आयुष्यभर सोबत राहते. बाहेरुन घरात येताना हात-पाय स्वच्छ धूउन घरात प्रवेश करावा. बहुतांश वेळा मुले बाहेर उघड्यावर खेळतात आणि तसेच घरात प्रवेश करतात. ज्यामुळे बाहेरील अनेक किटक थेट घरात प्रवेश मिळवितात आणि घरातील अनेक लोक आजारी पडतात. शौचास जाऊन आल्यावर सुद्धा स्वच्छ हात-पाय धुवावे

आणि मगच घरात यावे. जेवण करण्यापूर्वी हात अगदी स्वच्छ धुवावे आणि कोरड्या रुमालाने साफ करावे. रात्री झोपण्या पूर्वी सुद्धा स्वच्छ हात-पाय धुतल्या नंतर छान झोप लागते की नाही ते पहा. म्हणजे स्वतः ची स्वच्छता ही जीवनात अत्यंत महत्वाचे आहे. याशिवाय आपले जीवन दीर्घायुष्य होउच शकत नाही. अस्वच्छ रहाणे म्हणजे आपले अर्धे आयुष्य कमी करून घेण्यासारखे आहे. त्याच अनुषंगाने नुकतेच आपण जागतिक हात धुण्याचा दिवस साजरा केला आहे. त्यातून आपणास हाच संदेश मिळतो की स्वच्छ रहा ; निरोगी रहा. स्वतःच्या स्वच्छतेनंतर आपण आपल्या घराच्या स्वच्छतेकडे लक्ष देतो आणि ते आवश्यक आहे. कारण आपले ज्याठिकाणी उठणे, बसणे, खाणे, आणि पिणे असते त्या ठिकाणी स्वच्छता असणे गरजेचे आहे. त्यामुळे रोज सकाळी आणि संध्याकाळी आपले घर झाडूने साफ करीत असतो. आपले अंगण स्वच्छ करतो. घरातील आणि अंगणातील कचरा परिसरात टाकतो. म्हणजे आपणास परिसर घाण असलेले चालते परंतु आपले घर आणि अंगण स्वच्छ असावे असे वाटते ही प्रत्येकाची मानसिकता आहे. हा बदल करण्यासाठी स्वच्छतेचे धडे किंवा पाठ आज समाजाला शिकविण्याची खरी गरज आहे. सार्वजनिक ठिकाणी अस्वच्छता करणे हे चुकीचे आहे हे कळतय पण वळत नाही अशी स्थिती झाली आहे.

आज ग्रामीण भागात जर गेलो तर गावाच्या प्रवेशालाच दुर्गन्धी सुरु होते. प्रत्येक जण उघड्यावर शौचास जाउन गावाचा प्रवेशाचा संपूर्ण रस्ता अस्वच्छ करतात. यात कधी बदल होणार आहे ? गावात असलेली शाळा आपणास कधीच स्वच्छ ठेवता येत नाही. शाळा सुटली की गावातले काही रिकामटेकडे पोरे शाळेत येऊन वर्ग खोल्याच्या भिंती खराब करतात. काही गुटखा शौकीन मुले पान तंबाखू खातात आणि सर्व परिसर कधी कधी भिंती रंगवून टाकतात. दारू पिणारे मंडळी दारू पितात आणि वर्ग खोलीत बाटली फेकतात तर काही जण बाटली मैदानावर टाकतात, अश्या रीतीने सकाळी स्वच्छ केलेला शाळेचा परिसर सायंकाळी घाण केल्या जातो. शालेय स्वच्छालय कोणत्याच गावात चांगली ठेवली जात नाहीत. ज्या गावात शालेय स्वच्छालयाची देखभाल स्वतः गावकरी करीत असतील त्यांचे अभिनंदन करावेसे वाटते. गावात इतर काही ठिकाणी सुध्दा ही मंडळी अस्वच्छता पसरवितात. ज्यामुळे सर्वत्र घाणीचे साम्राज्य पसरते. त्यामुळे गावात साथीचे अनेक रोग पसरतात. मग दवाखाना आपल्या मागे लागते. जेथे लाखो रुपये खर्च करावे लागते तरी आपले डोळे उघडत नाही आणि आपला गांव स्वच्छ ठेवत नाही. डेंग्यू सारखा आजार तर कधी कधी आपला जीव ही घेतो. हा रोगप्रसार फक्त आणि फक्त आपल्या अस्वच्छतेमुळे होते याची जाणीव आपणास व्हायला हवी.

ग्रामपंचायत कार्यालय जमेल तेवढे कार्य करते पण संपूर्णपणे त्यावर अवलंबून रहाणे हे ही चूक आहे. वैयक्तिक स्वच्छते सोबत गावाची स्वच्छता देखील तेवढीच महत्वाची आहे. सार्वजनिक ठिकाणी आपली वागणूक चांगली असेल तर परिसर स्वच्छ राहू शकते. बरेच जण सार्वजानिक ठिकाणी बेजबाबदरपणे वागतात आणि त्यामुळे परिसरात अस्वच्छता पसरत जाते. राज्य परिवहन महामंडळाच्या बस मध्ये प्रवास करताना असा अनुभव खास करून येतो. बसमध्ये प्रवास करणारे काही मंडळी पान तंबाखू आणि गुटखा खाऊन कोपऱ्यात थुंकुन सर्व जागा घाण करतात. त्यामुळे इतर प्रवाश्याना त्याचा त्रास होतो. धूम्रपान करण्यास सक्त मनाई आहे ह्या फलक ऐवजी कोपऱ्यात थुंकू नका असे फलक लावावे लागेल असे वाटते. सार्वजनिक ठिकाणी अस्वच्छ करणाऱ्या व्यक्तिस दंड लावण्याचा कायदा अस्तित्वात आहे मात्र फक्त तो कागदावरच आहे. त्याची अंमलबजावणी जर करण्यात आली आणि दंड लावण्याची प्रक्रिया चालू केल्यास अस्वच्छता कमी होईल, असे वाटते. बसनंतर सर्वात जास्त प्रवासी वाहून नेणारे रेल्वेमध्ये स्वच्छता दिसणे खूपच दुरापास्त आहे. आपले घर आणि परिसर स्वच्छ ठेवणारे नागरिक रेल्वेत मात्र सर्व काही विसरून वागतात. जेथे काही खाल्ली तेथेच कचरा करतात. ज्याचा त्रास इतर प्रवाश्याना होतो. कधी कधी त्याचे बळी आपणच ठरतो हे ही सत्यच आहे. बागेत सुध्दा आपली हीच बेफिकिर वृत्ती दिसून येते. पर्यटननाच्या स्थळी सुध्दा आपण स्वच्छ वागतो असे काही दिसून येत नाही. त्यामुळे बस आणि रेल्वेमधील स्वच्छता असो वा इतर ठिकाणची स्वच्छता ही आपल्या हातात आहे. ती आपली सर्वाची मालमत्ता आहे अशी काळजी घ्यावी. आपण एकटे स्वच्छ राहण्याचा प्रयत्न करू या आपल्या सोबत एक-दोन व्यक्ति तरी निश्चितपणे या मार्गावर येतात. महात्मा गांधीजी यांनी ज्याप्रकारे आपल्या जीवनात स्वच्छतेला महत्त्व दिले होते. तसे आपण ही महत्त्व देऊ या. स्वच्छ भारत निर्माण करण्यात आपले ही काही योगदान देऊ या.

# दफ्तराच्या ओझ्यापासून सुटका*

असोसिएटेड चेंबर्स ऑफ कॉमर्स अँड इंडस्ट्री ऑफ इंडिया (असोचेम) समितीमार्फत देशात नुकत्याच केलेल्या पाहणीत १३ वर्षांखालील ६८ टक्के शाळकरी मुलांना सौम्य स्वरूपाची पाठदुखी असल्याचे आढळले आहे. दप्तराचे ओझे वाहून ७ ते १३ वयोगटातील ६८ टक्के शाळकरी मुलांना पाठदुखी आणि कुबड येण्याच्या तक्रारी सुरू झाल्या आहेत. पाहणी अहवालात असे म्हटले आहे की, ७ ते १३ वयोगटातील ८८ टक्क्यांपेक्षा जास्त शाळकरी मुले त्यांच्या वजनाच्या ४५ टक्के वजन पाठीवर वाहून नेतात. मुलांच्या दफ्तराच्या ओझ्याविषयी यापूर्वी सुध्दा राज्य सरकारने उपाय योजना कराव्यात असे उच्च न्यायलयाने निर्देश दिले आहेत. यावर शासनाने परिपत्रक काढून मोकळे झाले परंतु त्याची अंमलबजावणी कश्याप्रकारे होत आहे याची खातरजमा अजून पर्यन्त केली नाही. मुलांच्या दप्तराचा कायदा २००६ नुसार दप्तराचे ओझे मुलाच्या शरीराच्या वजनाच्या 10% पेक्षा जास्त असू नये. असा नियम असून ही या नियमची कोठेही प्रभाविपणे अंमलबजावणी होत नाही. मुलांच्या पाठीवरील दफ्तराचे ओझे कसे कमी करावे याबाबत शाळाप्रमुखांनी उपाय योजना करणे आवश्यक आहे. दफ्तरमध्ये आवश्यक बाबी म्हणजे सर्व विषयाची पुस्तके, विषयाच्या वह्या, रफ वही, स्वाध्याय पुस्तिका, जेवणाचा डबा हा विना अनुदानित शाळेतील मुलांसाठी आणि पाण्याची बाटली ह्या सर्व बाबीचा विचार केल्यास नक्कीच दफ्तराचे ओझे वाढणार यात शंकाच नाही. यावर खालील उपाय करता येतील असे वाटते. प्रत्येक शाळेत लॉकर जरी उपलब्ध करून दिल तरी मुलांच्या पाठीवरील दफ्तराचे ओझे कमी होईल असे वाटत नाही. काही जण यासाठी टैब चा पर्याय सुचवतता मात्र ती खर्चिक बाब आहे. सर्वाना टैब पुरवठा करणे मोठे अवघड काम आहे. त्यासाठी स्वस्त आणि सुलभ उपाय योजले तर त्याचा फायदा राज्यातील सर्व मुलांना होऊ

शकते. राज्यात आज मराठी, हिंदी, इंग्रजी, गणित, परिसर अभ्यास भाग एक आणि दोन असे सहा विषय अभ्यासक्रमामध्ये समाविष्ट केले आहेत.

* वारनिहाय विषयाच्या वहीचा वेळापत्रक तयार करणे

मुले विषयच्या वह्या रोजच्या रोज ने आण करतात. याचा भार आपणाला सहज कमी करता येतो. सहा दिवसाचे सहा विषय आणि आणि त्याच दिवशी ते वह्या तापसण्याचे काम केल्यास बरेच काम सुलभ होते आणि दफ्तराचे ओझे सुध्दा कमी होईल. यामुळे मुलांना चांगला वेळ मिळतो आणि यात सातत्यपणा येईल. सध्या प्रचलित पद्धतीनुसार धडा संपला की गृहपाठाची वही पूर्ण करणे आणि सर सांगतील त्यावेळी दाखविण्याची ही प्रथा आत्ता जुनी झाली त्यात काही बदल करणे आवश्यक आहे. तेंव्हा वार निहाय वह्याचे नियोजन नक्की फलदायी ठरेल असे वाटते.



# वार निहाय विषयाचे नियोजन

ज्या पद्धतीने वार निहाय विषयाच्या वह्याचे नियोजन केल्या आहे त्याच पध्दतीने जर वारनिहाय विषय नियोजन केल्यास दफ्तराचे ओझे बऱ्याच अंशी कमी होईल असे वाटते. आपण विषयाच्या तासिका, भारांश या सर्व बाबीचा विचार करून एका दिवसात सर्व विषयावर अध्यापन करतो. घरी गेल्यानंतर मुलांना सर्व विषयांचा आढावा घेताना नाकी नऊ येतात आणि राहिलेला अभ्यास कधी करावा ? हा प्रश्न पडतो. त्याऐवजी एका दिवशी एक विषय दिवसभर अध्यापन केले तर मुलांना त्याच विषयावर भर देता येते. विषयाची एकच लिंक असते. शिक्षक सुद्धा या पध्दतीने आपल्या विषयाला न्याय देऊ शकेल. सकाळच्या सत्रात विषयाचे अध्यापन करता येईल आणि दुपारच्या सत्रात त्याच विषयाशी संबंधित पश्नोत्तर किंवा स्वाध्याय सोडवून घेतल्यास खूप फायदा मिळू शकतो. विद्यार्थी च्या गुणावत्तेत ही वाढ होते. यामुळे मुलांच्या दफ्तरात एक पुस्तक एक वही बाकी इतर साहित्य राहील म्हणजे वजन किती कमी होईल याचा आपण अंदाज लावू शकतो. पण ही पध्दत एका शिक्षकाने एका शाळेत राबवून चालणार नाही. राज्यातल्या सर्व शाळेत ही पद्धत चालू केली तर मुलांचे आरोग्य वाढेल ते निरोगी राहतील. सायकल चालवित पाठीवर दफ्तराचे ओझे घेऊन शाळेला जाणाऱ्या मुलांची अवस्था तर खुपच वाइट आहे, बिकट आहे.

*बिन दफ्तराची शाळा

महिन्यातुन एक किंवा दोन दिवस मुलांना दफ्तर विना शाळेत बोलावावे. त्यादिवशी मुलांसोबत गप्पा-टप्पा आणि अवांतर चर्चा करावी. आठवडाभर शिकवलेल्या भागावार औपचारिकपणे प्रश्नउत्तर विचारावे. प्रश्नमंजुषा सारखे उपक्रम राबाववे. निबंध स्पर्धा, रांगोळी

स्पर्धा, वक्तृत्व स्पर्धा, गायन स्पर्धा यासारखे कला प्रदर्शनाचे कार्यक्रम आयोजित करण्यात यावे. एखाद्या निसर्गरम्य ठिकाणी डबा पार्टी करावी, क्षेत्रभेट करावे, अश्या दफ्तराविना शाळेत आल्यामुळे मुले आनंदात शाळेत येतात आणि त्यांना शाळेचा लळा ही लागेल. विशेष म्हणजे त्याच्या पाठीवर एका दिवसाचे दफ्तराचे ओझे राहणार नाही.

पाठीच्या वाढत्या तक्रारींचा आणि मणक्याचा आकार बदलण्याचा संबंध हा अतिरिक्त आणि असमान ओझ्याशी आहे. त्यामुळे मणक्याची गंभीर स्वरूपाची हानी होते आणि अनेकदा बरे न होणारे पाठीचे दुखणे बळावते. कमी वयात मणक्यांना आलेली सूज, स्लीप डिस्क, सततची पाठदुखी, मणक्याची लवकर झीज होणे आदी तक्रारी मुलांना आहेत, असे असोचेमच्या आरोग्य समितीचे अध्यक्ष बी. के. राव यांनी सांगितले.

मुलांच्या दफ्तराच्या अतिरिक्त ओझ्यामुळे येणाऱ्या ताणाने मुलांच्या मस्कोक्युलेटल सीस्टिमच्या वाढीवर परिणाम होतो. असे तज्ञ डॉक्टर चे म्हणणे आहे. या सर्व बाबीचा विचार करून आत्ता पालकांनी शाळेकडे मुलांच्या पाठीवरील ओझे कमी करण्याविषयी आग्रहाची मागणी लावून धरून त्याचा पाठपुरावा करणे सुद्धा आवश्यक आहे अन्यथा भविष्यात आपली मुले निरोगी राहतील ? याची खात्री नाही

# शिक्षकांचा सन्मानाचा दिवस

शिक्षक दिन जवळ आले की आपल्या सर्वाना आपणास शिकविलेल्या शिक्षकांची आठवण येते. समाजतील प्रत्येक व्यक्ती या दिवशी शिक्षकांचा मान सन्मान करतो. प्रत्येकाचा एक दिवस ठरलेला असतो त्याप्रमाणे शिक्षक मंडळी साठी 5 सप्टेंबर हा दिवस भारताचे दूसरे राष्ट्रपती डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन् यांचा जन्मदिवस संपूर्ण भारतात शिक्षक दिन म्हणून साजरा केला जातो. शिक्षकी पेशेपासून आपल्या जीवनाला सुरुवात करणारे राधाकृष्णन् भारताच्या सर्वोच्च अश्या राष्ट्रपती पदापर्यन्त पोहोचले. त्यांचा आदर्श डोळयासमोर ठेवून प्रत्येक शिक्षकानी राहावे, आचरण करावे, दिशाभूल होणाऱ्या शिक्षकांना परत रस्ता मिळावा यासाठी हा दिवस शिक्षक बांधवासाठी अत्यंत महत्वाचे आहे. तसे पाहिले तर शिक्षकासाठी सर्वच दिवस महत्वाचे आहेत. रोजच त्यांचा संबंध सजीव असणाऱ्या मुलांशी येतो. त्यामुळे त्यांना रोजच जिवंत वेगवेगळे अनुभव येतात. शेतकरी आपल्या शेतातील, घरातील आणि बाहेरील भरपूर कामे वर्षभर बैलाकडून करवुन घेतो त्याबदल्यात पोळयाला त्याला सजवुन धजवून त्याला गोड धोड खाऊ घालून पूजा अर्चा केली जाते असाच काही प्रकार शिक्षक मित्राच्या बाबतीत घडते असे मनात नेहमी शंका डोकावत असते. फक्त आजच का म्हणून सन्मान करायचा ? वर्षभरात असे अनेक दिवस किंवा महत्वाचे दिन आहेत ज्यावेळी शिक्षक मित्राचा सन्मान करता येतो. मुलींच्या शिक्षणाची ज्योत पेटविणारी क्रांतीज्योती सावित्रीबाई फुले यांच्या जन्म दिनी राज्यातील तमाम महिला शिक्षिकाचा गौरव गाव स्तरा पासून देश स्तरा पर्यन्त केला जावा. मुलीसाठी पहिली शाळा उघडणारे महात्मा ज्योतिबा फुले यांच्या जयंती दिनी राज्यातील उत्कृष्ट शिक्षण प्रणालीत काम करणाऱ्या शिक्षका पासून तर अधिकारी मंडळी पर्यन्त सत्कार करावा. स्वामी विवेकानंद यांच्या जयंतीच्या दिवशी तरुण तडफदार युवक शिक्षकाचा सन्मान करावा. स्वातंत्र्य दिन आणि प्रजासत्ताक दिन या दिवशी फक्त ध्वजारोहण न करता शाळेतील उत्कृष्ट शिक्षकांचा गौरव सर्वा समक्ष करावा. राजमाता जिजाऊ यांनी छत्रपती शिवाजी महाराज यांच्यावर उत्तम संस्कार केले म्हणून स्वराज्य निर्मितीची कल्पना सत्यात साकारण्यात आली. त्यांच्या जयंती निमित्त समाजातील अश्या थोर माता जे की शिक्षिका आहेत आणि त्यांचे पाल्य जीवनात यशस्वी झाले आहेत अश्याचा सत्कार करणे आवश्यक आहे. ज्यांच्या अंगी नेतृत्व गुण चांगले आहेत असे शाळा प्रमुख मुख्यध्यापकाचाही सन्मान भारताचे पोलादी पुरुष सरदार वल्लभभाई पटेल यांच्या जयंती दिनी करण्यात

आल्यास यथोचित होईल असे वाटते. काही वेळा शाळेत विविध स्पर्धाच्या माध्यमातून विद्यार्थी तालुका, जिल्हा, विभाग, राज्य किंवा देश स्तरावर चमकतात तेंव्हा विद्यार्थ्या सोबत मार्गदर्शक असलेल्या शिक्षकाचा ही गौरव केले तर चांगले प्रोत्साहन मिळेल. सोशल मिडियात वाचण्यात आले की पाच सप्टेंबरला शिक्षक दिन का साजरा करायचा आम्ही, त्यांनी शैक्षणिक क्षेत्रात मोलाची अशी काय कामगिरी केली त्यापेक्षा महात्मा फुले यांच्या जयंती दिनी हा दिवस साजरा केला जावा ह्या मतप्रवाह मध्ये बरीच मंडळी दिसून येतात. अशा आणि इतर मत असणाऱ्या लोकांसाठी वरील पर्याय सर्वोत्तम आहे असे वाटते. एखादे दिवस साजरे करीत असताना त्या दिवसामागची संकल्पना स्पष्ट करून घेणे अत्यंत महत्वाचे आहे. मात्र समाजात शिक्षकांना आजच्या 5 सप्टेंबर चा दिवस सोडला तर बाकीच्या दिवशी फारच विचित्र अनुभव येतो त्याचा कुठे तरी विचार व्हायला हवा.

शिक्षक हा समाजाचा आरसा असतो. आरश्यावर धूळ साचली असेल तर त्यातील प्रतिमा स्पष्ट न दिसता धूसर दिसते आणि त्यावरील धूळ साफ केल्यावर अगदी स्पष्ट दिसते. असेच काही काम शिक्षक मंडळीचे आहे. गावातील अनाड़ी, अनपढ आणि अज्ञान अश्या लोकांना साक्षर करणे हे शिक्षकांचे काम आहे. शाळेतील मुलांना अक्षर व अंक ज्ञान दिले तर भविष्यात ही मुले जेव्हा भारताचे नागरिक होतील त्यावेळी त्यांच्यावर अनाड़ी, अनपढ आणि अज्ञान हा ठपका लागू नये याची काळजी प्रत्येक शिक्षकांने घ्यावे यात गैर काही नाही. मात्र ही भावना व्यक्त करताना परिस्थिती आणि उपलब्धता या गोष्टीचा ही विचार करायला हवा. मात्र समाजात या बाबीचा विचार न करता शिक्षक मंडळीना दोष दिले जाते, मुलाच्या अपयशाचे खापर शिक्षकांच्या डोक्यावर फोडले जाते. कदाचित काही ठिकाणी काही अंशी शिक्षक जबाबदार असतील ही पण त्यावरुन सर्व शिक्षक एकाच माळेचे म्हणी समजणे योग्य आहे का ? गव्हासोबत कीडे रगडण्याची ही प्रक्रिया समाजतील होतकरु आणि उपक्रमशील शिक्षकांना घातक आहे. त्यामुळे त्यांच्या मनात निरुत्साह आणि नाउमेदपणा तयार होतो. काम करणाऱ्या शिक्षकावर कौतुकाची एक थाप पुरेसे असते, कसल्याही प्रकारचे नियम किंवा बंधन नसताना ही मग तो मन लावून काम करू शकतो. पण याच ठिकाणी कमतरता जाणवते. शाळेत येणारा अधिकारी, पदाधिकारी किंवा अन्य कोणी त्यांच्यावर कौतुकाची थाप तर दूरची गोष्ट साधी त्यांची प्रेमळपणाने विचारपुस देखील करत नाही. त्यामुळे शिक्षक नाराज होतात निराश

होतात. समाजात एक नियम आहे , जो करतो तो चुकतो. जो करतो त्यालाच इतर लोकांचे बोलणे खावे लागते. जो काहीच करत नाही त्याला कोणी काहीच करत नाही "जाऊ दया हो त्यांच्या मागे लागून काही फायदा नाही तो जन्मात कधी काही केला नाही तो आज काय करेल ? " असे म्हणून काम न करणाऱ्याच्या मागे कोणी लागत नाही ही सत्य परिस्थिती आहे. इथे शिक्षक मंडळीच्या बाबतीत ही असेच घडत असताना दिसत आहे. मन लावून , जीव आतून शिकविणाऱ्या शिक्षकला कधी ही मान सन्मान मिळत नाही आणि हातात खडू न धरलेल्या शिक्षकास भारताच्या राष्ट्रपतीच्या हस्ते राष्ट्रीय आदर्श शिक्षक पुरस्कार, राज्य पुरस्कार किंवा जिल्हा पुरस्कार दिला जातो. ही शिक्षण प्रणालीत असलेली फार मोठी शोकांतिका आहे. पुरस्कार मिळविण्यासाठी भरपूर अटी ची पूर्तता करावी लागते. एखादा नविन शिक्षक मुलांना खूप छान अध्यापन करीत असेल तरी त्यास तालुका स्तरीय पुरस्कार सुद्धा दिल्या जात नाही. पुरस्कार मागून घ्यावा लागतो. मी अमुक वर्षे सेवा केली असून अमुक सामाजिक, शैक्षणिक कार्य केले आहे त्यामुळे यावर्षीचा पुरस्कार मलाच द्यावे अशी याचना करावी लागते. वेळप्रसंगी शिफारस लावावी लागते आणि शेवटी धनलक्ष्मीचा ही वापर करावा लागतो. मला सांगा त्या पुरस्काराला काही महत्व आहे का ? माझा एक शिक्षक मित्र याच धोरणामुळे पुरस्कारापासुन दूर आहे. त्याचे म्हणणे असते की माझ्या नावाची शिफारस माझ्या क्षेत्रीय अधिकाऱ्यांनी केली तर मला पुरस्कार घेताना खूप आनंद होईल. त्याही पेक्षा माझी मुले मला हसत हसत नमस्कार करतात आणि भविष्यात ते मला विसरणार नाहीत हेच माझ्या साठी पदक आहे व पुरस्कार पण. खरोखर जे शिक्षक विद्यार्थी हेच दौलत आणि सर्व काही मानतात त्यांना कोणत्या पुरस्काराची किंवा पदकाची गरज आहे का ? मला पुरस्कार दया म्हणून याचना करणारी पद्धत भविष्यात बंद होईल असा विश्वास यावर्षीच्या ऑनलाइन पुरस्कार नोंदणी मुळे होईल असे वाटते. आजचे पाऊल भविष्यात नक्कीच आशादायी चित्र तयार करेल असा विश्वास ठेवण्यास काही हरकत नाही. समाजाचा ही शिक्षकाकडे पाहण्याचा दृष्टिकोन बदलणे आवश्यक आहे. त्या दृष्टीने आज सकारात्मक विचारधारा चालू आहे ती अंखड़ित रहावी.

स्वातंत्र्य पूर्व आणि स्वातंत्र्य नंतर जर शाळा आणि शिक्षक या दोन बाबीचा आपण विचार केलो तर आजचे शिक्षक सर्व बाबतीत समाधानी आहेत. त्यांना कोणत्याच गोष्टीची कमतरता नाही, उणीव नाही. दळणवळणच्या सुविधेमुळे आज शिक्षकास कोणत्याच गोष्टीचा

त्रास होत नाही तरी शाळेतील गुणवत्ता म्हणावी तशी का नाही ? याचे कारण शोधण्यासाठी संशोधनच करावे लागते. त्यातील काही महत्वाचे मुद्दे म्हणजे आज शिक्षक हा पेशा नसून तो एक व्यवसाय बनला आहे. सन 1990 ते 1998 या काळात शिक्षक होणाऱ्या लोकांकडे वेगळयाच नजरेने पाहिले जायचे. मागता येईना भीक तर मास्तरकी शीक असे याबाबतीत बोलले जायचे. त्यानंतरच्या काळात मात्र हा झटपट नोकरी आणि भरपूर पगार यामुळे प्रत्येक जण याक्षेत्राकडे आकर्षिले गेले , आणि या क्षेत्रात आमुलाग्र बदल होत गेला. आज भावी शिक्षक होण्यासाठी लाखों मुले गुडघ्याला बाशिंग बांधून तयार आहेत. मात्र सरकार गेल्या पाच सहा वर्षापासुन शिक्षक भरती बंद केल्यामुळे डी टी एड धारक मुलांची ससेहोलपटचालू आहे. शिक्षक होण्यासाठी लाखों मुले तयार आहेत, समाजात आज ते जरी शिक्षक नसतील म्हणून काय झाले ते सुद्धा खाजगी शिकवणी किंवा इतर काही माध्यमातून शिकविण्याचे काम करीत आहेत त्यांचा ही कुठे तरी मान सन्मान होणे आवश्यक आहे. पुरस्काराने माणसाला स्फूर्ती मिळते, चेतना मिळते, आणि त्यांच्यात ऊर्जा तयार होते. त्यामुळे लहान वयात पुरस्कार द्यावे की सेवानिवृत्ती जवळ आलेल्या व्यक्तीला द्यावे हा विचार करण्यासारखा प्रश्नांची सोडवणूक करावी एवढी अपेक्षा आजच्या शिक्षक दिनानिमित्त व्यक्त करावे वाटते.

# शालेय अभ्यासक्रमात खेळाचे महत्व

रिओ ऑलिम्पिक मध्ये भारत पदक तालिकेत आपले खाते उघडते किंवा नाही याबाबत प्रत्येक भारतीयांच्या मनात शंका निर्माण होत असताना साक्षी मलिकने कुस्तीत कास्य पदक जिंकून 125 कोटी भारतीयांची शान राखली तर बैडमिंटनपटु पी व्ही सिंधुने रौप्य पदक मिळवित सर्व भारतीयांची मान उंचावली. तसे पाहिले तर इतर देशाच्या तुलनेत आपली एवढी मोठी लोकसंख्या असून सुध्दा पदक मिळण्याच्या बाबतीत खुपच मागे का आहे ? यावर विचार करणे आवश्यक आहे. खरे तर खेळाची सुरुवात प्राथमिक शाळेपासून व्हायला पाहिजे. उत्तम आरोग्य असेल तर त्याचे डोके सुध्दा उत्तम असते अश्या अर्थाची एक म्हण वाचण्यात येते. त्याचा अर्थ शालेय जीवनापासून लक्षात घ्यायला हवे. कारण प्राथमिक शिक्षणाची सुरुवात शाळेत होते आणि याच ठिकाणी त्यांच्या आरोग्याकडे दुर्लक्ष केल्या जाते. मुलाचा शारीरिक,भावनिक विकास होण्यासाठी खेळ आवश्यक आहे. मुले खेळण्यात जास्त वेळ घालू लागली की पालकाची ओरड ठरलेली असते की आत्ता किती वेळ खेळणार ? चल बस अभ्यासाला. ही नेहमीची पालक वर्गाची ओरड प्रत्येक घरात दिसून येते. यास पालकाना दोष देऊन चालणार नाही कारण सध्या परिस्थितीच आहे तशी खेळापेक्षा अभ्यासाला महत्व जास्त देण्यात येते.

संगणकच्या युगात काही चांगले घडत आहे तर काही वाईट सुध्दा घडत असताना दिसत आहेत. मोबाईल नावाच्या जादुई खेळणीने मुलांचे सर्वच खेळ हिरावुन घेतले आहे असे वाटते. पूर्वी ग्रामीण भागातील शाळा आणि रिकामी जागा मुलांच्या खेळाने भरून जात असत. शहरात खेळाची मैदाने सायंकाळी आणि रविवारच्या दिवशी मुलांनी फुलून जायचे. पण आज हे चित्र फार कमी पाहायला मिळत आहे. कारण आज मुले घरात बसल्या ठिकाणी मोबाईल वर सर्व खेळ खेळत आहेत. मैदानी खेळ कमी झाले. त्याचा परिणाम त्यांच्या शरीरावर होत आहे.

त्यांचा मेंदू काम करेनासे झाले आहे. शरीर जड होत आहे. मुलामध्ये चैतन्य नावाची वस्तु सापडत नाही. या सर्व बाबीवार एकच उपाय ते म्हणजे शारीरिक खेळ. मुलांचा अभ्यास तेंव्हाच चांगला होऊ शकतो ज्यावेळी त्यांचे मन प्रसन्न असेल आणि मन प्रसन्न ठेवण्यासाठी त्यांना मैदानावर खेळण्यास नेणे गरजेचे आहे. मैदानावर फिरणे असो खेळ खेळणे असो वा इतर काही करणे यामुळे मुलांना ताजी हवा मिळते जे की शरीरला आवश्यक आहे आणि मन प्रफुल्लित होते. म्हणून मुलांना नुसते अभ्यास करा असे म्हटल्याने मुलांचा अभ्यास नीट होणार नाही. ते आपल्या धाकामुळे वाचन लेखन अभ्यास करतील पण त्यांच्या लक्षात राहणार नाही, हे ही तेवढेच सत्य आहे त्यामुळे रोज सकाळी आणि सायंकाळी थोडा तरी वेळ खेळ खेळणे आवश्यक आहे. पण आज आपल्या मुलांची सकाळ आणि सायंकाळची वेळ ही शिकवणीमध्ये जात आहे. शाळेत सुध्दा खेळाचा एक तास असतो मात्र शाळेत किती व कोणकोणते खेळ शिकवल्या जातात हा एक संशोधन करण्याचा विषय होऊ शकतो. त्यास शिक्षक दोषी आहेत असे नाही कारण तेथे खेळाच्या शिक्षकाची कमतरता भासते. आज कित्येक शाळेत खेळाचे शिक्षकच नाहीत तर काही शाळेत खेळाचे मैदान उपलब्ध नाही तर मुले काय खेळतील आणि कुठे खेळतील ? कधी कधी मुले ज्यांच्या शाळेत मैदान आहे तेथे खेळताना दिसून येतात त्यांना कोणाचे मार्गदर्शन नसते, ना कोणाचा कानमंत्र ते आपले उगीच खेळ खेळत असतात. परंतु त्यांना चांगला गुरु मिळाला तर अनेक स्तरावर आपले नाव व कीर्ती मिळवू शकतात. शाळेत शिकलेल्या खेळाचा आयुष्यात फायदा होतो. शालेय जीवन संपल्या वर आपले कोणत्याच खेळाकडे लक्ष जात नाही कारण त्या खेळाविषयी जी रूची शाळेत तयार व्हायला पाहिजे ते होत नाही. शाळेतील खेळ पावसाळी आणि हिवाळी खेळापूरती औपचारिकपणे पूर्ण केल्या जाऊ नये.

शालेय अभ्यासक्रमात खेळाचा तास हा शेवटचा असतो ज्यात सहसा काहीच होत नाही कारण मुलांना घरी जाण्याचे वेध लागलेले असते. दुपारची पूर्ण वेळ खेळासाठी राखीव ठेवणे आवश्यक आहे. शाळेतून विविध प्रकारच्या खेळाची तयारी होणे अपेक्षित आहे. यासाठी शासनाने या बाबिकडे गांभीर्याने लक्ष देणे गरजेचे आहे. निदान सहाव्या वर्गापासुन तरी खेळाच्या शिक्षकांची नेमणूक करणे आवश्यक आहे. ज्यामुळे मुले योग्य दिशेत मोकळेपणाने खेळ खेळतील. एखाद्या खेळात निपुण व्हायाचे असेल तर विषय शिक्षकच फक्त त्यास न्याय देऊ शकतो. तीन वर्षापूर्वी कला , कार्यानुभव आणि क्रीडा विषय शिकविण्यासाठी अंशकालीन निदेशकची नेमणूक करण्यात आली होती. तेंव्हा मुले त्या विषयात अभ्यास करताना आनंदात

होती. पण त्यांचा आनंद दीर्घकाळ टिकू शकले नाही. कारण पुढे त्यांची नेमणूक रखडली. प्रत्येक सहावी ते दहावीच्या वर्गासाठी क्रीडा शिक्षक असेल तर भविष्यात साक्षी आणि सिंधू मोठ्या प्रमाणावर तयार होतील. अशी आशा करण्यास हरकत नाही. कोणत्याच सोई सुविधा उपलब्ध नसेल तर आपली मुले स्पर्धेत कशी राहतील याचा विचार करणे आवश्यक नाही काय ? जर आत्तापर्यन्तच्या ऑलिम्पिक चा इतिहास पाहिले असता भारत देश सन 1900 पासून यात सहभाग घेत आहे. आजपर्यन्त भारताने 9 सुवर्ण चार रौप्य आणि 12 कास्य असे एकूण 25 पदक गेल्या 116 वर्षात मिळविले आहे आणि गेल्या 20 वर्षाचा मगोवा घेतल्यास असे लक्षात येते की सन 1996 पासून भारताने एक सुवर्ण, तीन रौप्य आणि नऊ कास्य पदकाची कमाई केली याचाच अर्थ गेल्या वीस वर्षपासुन भारताचा ऑलिम्पिक मधील सहभाग वाढला असून जास्तीत जास्त खेळ खेळून पदक मिळविण्याच्या दिशेने प्रयत्न चालू आहेत म्हणण्यास हरकत नाही. मात्र अजूनही मुलांना या खेळाच्या बाबतीत अधिक जागृत करून त्यांना खेळाकडे आकर्षित करणे आवश्यक आहे. शाळा स्तरापासून ते देश स्तरापर्यन्त विविध स्पर्धाचे आयोजन करून खेळाडूना प्रोत्साहन मिळवून देणे याची आत्ता खरी गरज आहे.

# स्वातंत्र्याची सत्तरी

आपण खुप नशीबवान आहोत की स्वातंत्र्य उत्तर काळात आपला जन्म झाला. गुलामगिरी म्हणजे काय असते याची जरा सुध्दा आपणास जाणीव झाली नाही. आपण स्वातंत्र्यलढा चा इतिहास फक्त पुस्तकातुन वाचन करतो आणि तेच लक्षात ठेवण्याचा प्रयत्न करतो. कधी कधी तर अमुक तारीख आणि अमुक व्यक्ती माझ्या लक्षात राहतच नाही असे ही बोलून जातो. जुलमी इंग्रजांच्या गुलामगिरीत लोकांनी काय हालअपेष्ट सहन केल्या असतील ? त्यांचा इतिहास वाचूनच अंगावर काटा उभा राहतो. सुखदेव, राजगुरु आणि भगतसिंग यांची नावे ऐकली की मनात स्फूर्ती निर्माण होते. भारतमाता की जय म्हटल्यामुळे शाळकरी शिरीषकुमारला इंग्रजांनी गोळया झाडल्या आणि आज आमच्या तोंडातुन भारतमाता की जय बारीक़ आवाजात निघतो. कारण आपणाला स्वातंत्र्य फुकटात मिळालेले आहे.त्यामुळे त्याचे आपणास काही एक किमत नाही. म्हणतात की फुकटच्या वस्तूची किमत विकत घेतल्याशिवाय कळत नाही.

आज आपणास प्रत्येक गोष्टीचे स्वातंत्र्य आहे. इंग्रज लोक भारतातुन निघून जाऊन 70 वर्षाचा काळ गेला. या 70 वर्षात भारताने लक्षणीय प्रगती केली नाही हे जरी सत्य असले, तरी संपूर्ण जग भारत देशाकडे विकसनशील देश या नजरेतून पाहते. आज भारतात मनुष्यबळ तर आहेच शिवाय बुद्धिमान लोकांची संख्या सुध्दा भरपूर आहे. त्यामुळे जग आपल्याकडे बुद्धिमान व हुशार युवकांचा पुरवठा करणारा देश म्हणून पाहतो.

आपल्या देशात युवकासाठी रोजगार नाहीत म्हणून होणारी ओरड सर्वत्र आहे. विदेशात काय रोजगार मोठ्या प्रमाणावर आहेत काय ? अर्थात या प्रश्नाचे उत्तर सुध्दा नाही, असेच मिळणार. सर्वांना रोजगार मिळत नाही जो यासाठी पात्र असेल ज्याच्या जवळ बुद्धिमत्ता आहे त्याला जगात कोठेही रोजगार मिळेल यात शंका नाही. परंतु स्वातंत्र्य जसे फुकट मिळाले तसे सर्व काही फुकट मिळाल्यास जीवन सुखी होईल, असे स्वप्न रंगविनारे युवक

देशाच्या प्रगतीत काय हातभार लावतील ? ते फक्त रडण्याचे काम करतील. कारण त्यांना आयती ख्यायची सवय लागली. याबाबतीत मला आलेला एक अनुभव याठिकाणी नमूद करावासा वाटतो. पुण्यातील एक श्रीमंत व्यक्ती ज्याच्याकडे बंगला आहे,गाडी आहे, सर्व काही सुख सोई आहेत.त्यांचे कुटुंब खुप सुखात आणि मजेत आहे. ती व्यक्ती कुटुंबाला त्रास न देता आपल्याजवळील संपतीचे दान करतात. जे कोणी गरजू लोक त्यांच्याजवळ जातील त्यांना ते भरभरुन देणार. कधी त्यासाठी कंजुषी नाही करणार. एका सामाजिक कार्यक्रमात माझी त्यांच्यासोबत भेट झाली. त्या कार्यक्रमाचे सर्व काही खर्च त्यांनी एकट्यानी केला. हे ऐकून जरा आश्चर्य वाटले, जवळपास दोन लाखचा खर्च त्या सामाजिक कार्यक्रमात झाला. मला राहवले नाही म्हणून प्रश्न विचारले की, "आपल्या मुलांसाठी, लेकरा, बाळासाठी काही शिल्लक ठेवणार की नाही ! " यावर त्यांचे उत्तर ऐकून मी अवाक् झालो "मी येथून जेंव्हा exit होईन त्यावेळी माझ्याजवळ फक्त एक रूपया शिल्लक असेल"

त्यांचे बोलणे ऐकून मी पुढचा प्रश्न केला " मग आपल्या माघारी लेकरांचे काय ?" यावर ते म्हणाले "माझ्या बाबानी मला काय दिले फक्त शिक्षण. त्यांनी काहीच दिले नाही म्हणून तर मला कमाई करण्याचा मार्ग सापडला. नसता मी आळसी झालो असतो. बाप कमाई वर ऐश केली असती आणि संपलो असतो. माझ्या मुलाने पण त्याच पध्दतीने स्वतः आपल्या पायावर उभे राहावे, तरच खरे जीवन तो जगु शकेल अन्यथा आळशी बनून तो स्वतः ची प्रगती तर करणार नाहीच,शिवाय देशाची सुद्धा करणार नाही"

प्रत्येक पालक जर असा विचार केला तर देशात क्रांती घडेल की नाही. पण समाज आपणाला तसे जगु देत नाही. पोरगा म्हणतो बापाने काय ठेवालाय माझ्यासाठी ? आणि समाज म्हणतो बघा आपल्या लेकराची काळजी न करता सारी संपत्ती करून टाकली दान यास काय बाप म्हणतात काय ?" या उदाहरण या स्वातंत्र्यकाळच्या बाबतीत तंतोतंत लागु पडतो. कोण आपणास काय दिले यापेक्षा मी देशासाठी काय केलो याची एकदा तरी गोळा बेरीज आपण केली आहे काय ? ज्याप्रकारे मिसाइल मन तथा भारताचे माजी राष्ट्रपती डॉ. ए पी जे अब्दुल कलाम यांनी म्हटल्या प्रमाणे देशाला देण्यासाठी तुमच्याकडे 10 मिनिटे वेळ आहे काय ? हा प्रश्न सर्वानी आपल्या स्वतः च्या मनाला दिवसातुन एकदा तरी विचारवे आपणास पुढील

तीस वर्षात नक्कीच वेगळा भारत दिसेल ज्यावेळी आपण सर्व आपल्या भारतीय स्वातंत्र्याची शतकी साजरी करू. आपले विचार बदला देश आपोआप बदलेल. देशाला बदलान्याच्या काळजीत आम्हीच बदलायला तयार नाही.

जय हिंद ......! जय भारत .......!



# परीक्षेला जाता जाता .... *

फेब्रुवारी महिना उजाडला की, सर्वांना परीक्षेचे वेध लागतात. महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक परीक्षा मंडळाद्वारे या परीक्षेच्या कार्यक्रमाचे उदघाटन बारावीच्या परीक्षेने दरवर्षी करीत असते. तसे बारावीच्या परीक्षेला फेब्रुवारी महिन्याच्या 18 तारखेपासून सुरुवात झाली. त्यानंतर दहावीच्या परीक्षेला आजपासून सुरूवात होत आहे. मग इयत्ता पहिली ते नववी पर्यंतच्या विद्यार्थ्यांची परीक्षा होते. विद्यापीठाच्या परीक्षेने या परीक्षांचा शेवट होतो. परीक्षेच्या काळात मुलांवर एक वेगळयाच प्रकारचे दडपण जाणवते. वर्षभर केलेल्या अभ्यासाची फक्त दोन ते तीन तासात परीक्षा द्यावी लागते. बहुतांश वेळा असे होते की ऐनवेळी विद्यार्थी प्रश्नाचे उत्तर विसरतात. परीक्षेच्या काळात गोंधळून जाऊ नये किंवा मनावर जास्तीचे दडपण घेवू नये. परीक्षेच्या आदल्या दिवशी जागरण करून अभ्यास न करता निश्चित झोपी जावे. उद्याचा पेपर कसा जाईल ? याची अजिबात काळजी न करता आपले डोके शांत ठेवल्यास त्याचा परिक्षेच्या काळात निश्चितपणे फायदा होतो. नावडता विषय आपणाला अवघड वाटतो, त्याची जास्तच काळजी वाटते. त्यामुळे त्या विषयातील येत असलेला भाग सुध्दा आपण विसरून जातो. असे होऊ नये यासाठी त्या विषयाची धास्ती मनात न ठेवता परीक्षेला सामोरे जावे. इयत्ता पहिली ते आठव्या वर्गाची परीक्षा पध्दत बंद केल्यामूळे विद्यार्थ्यांचा परीक्षेला जाण्याचा सराव  कमी झाला असे म्हणणे चूकीचे ठरणार नाही. पूर्वी पहिल्या वर्गापासून घटक चाचणी व सहामाही म्हणजे प्रथम व द्वितीय सत्र परीक्षा होत असत. परिक्षेच्या काळात शाळेमध्ये सर्वत्र परीक्षेचे वातावरण असायचे, जो तो आपले डोके पुस्तकांत खुपसून अभ्यास करीत बसायचे, शक्यतो गृहपाठाच्या वह्या वाचून काढले जायचे कारण त्यातीलच प्रश्न परीक्षेत विचारल्या जायचे. परीक्षेला जातांना आपल्या उजव्या हाताच्या करंगळीने सामसोळीच्या शेपटाला स्पर्श केला तर पेपर सोपा जातो असं परीक्षेच्या आदल्या दिवशी मित्रांमध्ये चर्चा व्हायची. नेमकं परीक्षेला निघताना ती सामसोळी मात्र कुठच दिसायची नाही. पेपर सोपा गेला तर त्याची आठवण सुध्दा यायची नाही. परंतु जर पेपर

अवघड गेला असं जर वाटलं तर मनात रुखरुख लागायची. परीक्षेतला जातांना अजून एक प्रकर्षाने व्हायचं परीक्षेच्या पॅडला तुळशीचे दोन पान लावायचे. त्याचं काय गुपित आहे ते आजपर्यंत कळले नाही. आज शहरात अंगण नाही तर तुळस कुठं दिसणार. पण ही बाब अजूनही घरोघरी दिसून येत आहे. परीक्षेचा दिवस उजाडला की, सकाळी सर्व कामे आटोपून परीक्षेला पॅड घेऊन निघतांना आई ओरडून म्हणायची " अरे देवाच्या पाया पड, पेपर सोपा जाईल" तिच्या या बोलण्याचं मला हसू यायचे आणि मी म्हणायचो 'वर्षभर अभ्यास केल्यामूळे माझं पेपर सोपं जाणारच आहे. त्यासाठी देव काय मदत करणार आहे. तो काय स्वत: येऊन मला लिहायला मदत करणार आहे कां ? असा प्रति प्रश्न तिला विचारायचा. आपल्या देवाला कुणी काही असं बोललेलं तिला खपायचे नाही, रुचायचे नाही. ती मला समजावून सांगे की, 'देवाला पाया पडल्याने आत्मिक समाधान लाभते, बळ मिळते, एक वेगळा उत्साह येतो. यामूळे देवाला नमस्कार करायचा'. मग शेवटी आईचे मन रहावे म्हणून देवासमोर नतमस्तक व्हायचो. पहिला पेपर सोपा गेला की, आपसुकच दुस-या दिवशी परीक्षेला जाण्यापूर्वी पाय देवघरांकडे वळायचे. मग यानंतर जीवनात कोणती ही परीक्षा असो त्यापूर्वी आपले पाय देवघरांकडे वळतातच. आज ही आम्ही हीच प्रथा किंवा परंपरा आपल्या मुलांपर्यंत पोहचवित आहोत. आज आपली मुले जेंव्हा परीक्षेला निघतांत त्यावेळेस 'जा देवाचे पाया पड आणि मग परीक्षेला जा' असे आपण अगदी सहज म्हणतो. परीक्षेला जातांना देवाच्या पाया पडावे किंवा नाही हा वादातीत विषय आहे. त्यावर चर्चा केल्यास वादंग होण्याची शक्यता नाकारता येणार नाही. मात्र देवाच्या पाया पडल्यानंतर जो आत्मविश्वास मनात तयार होतो, ते अत्यंत महत्वाचे आहे. परीक्षा म्हणजे एक कसोटी, आयुष्यात घेत असलेले महत्वाचे वळण. या कसोटीत निर्भेळ यश मिळविण्यासाठी देवांसोबत घरातील वाड-वडिलांचे आशीर्वाद घेणे सुध्दा अत्यंत महत्वाचे आहे असे वाटते. ज्याप्रकारे पूर्वी रंणागणावर जातांना राजे महाराजे आपल्या पूर्वजांचे आशीर्वाद घ्यायचे तसेच काहीसे या परीक्षेच्या बाबतीत होत असते. स्वामी समर्थाच्या 'भिऊ नकोस मी तुझ्या पाठीशी आहे' या वाक्याने त्यांच्या भक्तात एक नवी प्रेरणा, उत्साह दिसून येतो दे रे हरी पलंगावरी अशी ज्याची वृती नाही त्याला परीक्षेची अजिबात भीती वाटत नाही. परीक्षेत जास्तीत गुण मिळावे यासाठी नकला मारणे ही स्वतः सोबत केलेली फार मोठी चूक आहे. त्यामूळे नकला मारून पास होण्यात काही अर्थ नाही. या परीक्षेत कदाचित

तुम्ही पास व्हाल पण आयुष्याच्या परीक्षेत नकलाच  नसतात तिथे मात्र नापास होण्याची शक्यता जास्त असते. नकला मारणे म्हणजे चोरी करणे. आणि चोरी  कधी  ना कधी पकडली जाते. म्हणून मुलांनो, परीक्षेत यशस्वीपणे तोंड देण्यासाठी परमेश्वर आपणास सुबुध्दी देवो, आत्मिक बळ देवो. दहावीची परीक्षा देणाऱ्या सर्वांना खुप खूप शुभेच्छा.



# मराठी भाषा गौरव दिन *

ज्येष्ठ साहित्यिक, नाटककार, कादंबरीकार तथा भारतीय ज्ञानपीठ पुरस्कार मिळविणारे मराठी साहित्यातील दुसरे साहित्यिक कविश्रेष्ठ विष्णू वामन शिरवाडकर उर्फ कुसुमाग्रज यांच्या जयंतीनिमित्त आज संपूर्ण महाराष्ट्रात 'मराठी भाषा गौरव दिन' साजरा होत आहे त्या निमिताने मराठी भाषेच्या विकासासाठी आपण सारे जाणीवपूर्वक प्रयत्न करायला हवे. मराठी भाषा ९ व्या शतकापासून प्रचलित भाषा आहे.

मराठी मातृभाषा असणाऱ्या लोकसंख्येनुसार मराठी ही जगातील पंधरावी व भारतातील चौथी भाषा आहे.मराठी ही महाराष्ट्राची राजभाषा आहे. मात्र आपल्याच राज्यात आपण आपल्या मराठी भाषेला पदोपदी ठार करीत आहेत. बहुतांश वेळा आपण गांभीर्याने विचार न करता भाषेचा वापर करीत असतो, त्यामुळे भाषेची पुरती वाट लागून जाते. ज्यांना भाषेच्या प्रत्येक शब्दांत असलेल्या सौंदर्य आणि सामर्थ्यांची जाणीव नसते, त्यांना वाक्यरचनेशी किंवा शब्दाशी काही देणे-घेणे नसते. अशा लोकांच्या भाषेमूळे मराठी भाषा रसातळाला जात आहे, म्हणणे चूकीचे ठरणार नाही. माणसाच्या जीवनांत आईचे स्थान जेवढे महत्वाचे असते तेवढेच मातृभाषेचे ही असायला पाहिजे. पण आज तिच्याबाबत जे चित्र दिसते ते दुर्दैवाने फार वेगळे आणि मन उदास करणारे आहे. ती स्थिती बदलण्याची जबाबदारी जिथे जिथे मराठी माणूस राहतो आहे, तिथे तिथे प्रत्येकाची आहे.

> आज प्रत्येकजण आपल्या पाल्यांना मराठीच्या शाळेत शिकविण्या ऐवजी इंग्रजी मिशनरीच्या शाळेत शिकविण्याकडे जास्त कल दिसून येत आहे. संपूर्ण जगात इंग्रजी भाषा बोलणा-यांची संख्या सर्वात जास्त आहे. इंग्रजी लिहिता-बोलता आली तर आपले मूल जगाच्या स्पर्धेत टिकू शकतो. माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षणातील इंग्रजी सोपी वाटावी

म्हणून त्याला K.G. पासून इंग्रजीचे धडे शिकविण्यास प्रारंभ केल्या जाते. सध्या पालकांचा असा एक भ्रम झाला आहे. की, प्राथमिक शिक्षण इंग्रजी माध्यमातून झाले की त्याला पुढील शिक्षण काही कठीण वाटत नाही.परंतु वास्तव काही उलट आहे. मातृभाषेतून शिक्षण घेतलेल्या मुलांच्या संकल्पना अधिक स्पष्ट होतात. त्यास घोकंपटटी किंवा वारंवार अभ्यास करावे लागत नाही. विषयाची संकल्पना मुलांना कळाली तर ते अगदी बिनधास्त पणे व्यक्त करू शकतात आणि त्यासाठी मातृभाषेतून शिक्षण अत्यंत महत्वाचे आहे. इंग्रजी शाळेत टापटीपपणा आणि होमवर्क पूर्ण करण्याची पध्दत एवढे दोनच बाबी कोटेकोरपणे पाळले जातात. येथे शिकविण्यासाठी तज्ञमंडळी उपलब्ध नसल्यामूळे थातूर मातूर शिकविले जाते याकडे मात्र साफ दुर्लक्ष केल्या जाते. पालकांकडून भरपूर पमाणात फिस च्या स्वरूपात पैसा उकळणे आणि त्या बदल्यात मात्र त्या मुलांना घोकंपटटीशिवाय काहीच मिळत नाही, हे वास्तव चित्र आहे. याउलट एखादी इंग्रजी शाळा असू शकते जे की पालक व विद्यार्थ्यांच्या सर्व आशा पूर्ण करू शकेल. पण अश्या शाळांच्या संख्या फार कमी. मुलांच्या भावना लक्षात न घेता आपण त्यांना त्या गैरभाषे कडे वळवितो तर याबाबीमूळे मुलांवर अपण अन्याय करीत नाही का ? याबाबीचा विचार कोणताही पालक करतांना आढळून येत नाही. या बाबतीत समाजातील काही शिक्षणतज्ञ किंवा जाणकार लोकांनी पालकांचे योग्य मार्गदर्शन करून त्यांची होणारी आर्थिक व मानसिक पिळवणूक थांबविणे गरजेचे आहे. इंग्रजी माध्यमात शिकणा-या मराठी मुलाची भाषा जर ऐकायला आणि पहायला मिळाली तर त्याची फारच कीव येते कारण त्यांना मराठी शब्दांचे अर्थ नीट कळत नाहीच शिवाय नियमानुसार अक्षरांचे लेखन सुध्दा करीत नाहीत.

संत तुकाराम महाराज यांनी शेजा-यावर प्रेम करा असा संदेश दिला आहे. मात्र ही मंडळी शेजा-यांशी नेहमी तुलनात्मक दृष्टीने पाहतात. पालक वर्ग नेहमी शेजा-यांच्या मुलांची तुलना करत असतात. शेजा-याचा मुलगा इंग्रजी माध्यमात शिकत असेल आणि रेन रेन कम अगेन म्हणत असेल तर आपले मूल सुध्दा असे गीत म्हणावे असे त्यांना वाटते परंतू त्या इंग्रजीच्या मुलांना रेन रेन कम अगेन चा अर्थ कळत नाही तो फक्त यांत्रिक पध्दतीने गात असतो परंतू आपला मराठी शाळेतील मुलगा ‘ येरे येरे पावसा ’म्हणताना त्याच्या चेह-यावरचे भाव स्पष्ट दिसतात. कारण त्याचा अर्थ त्याला कळालेला असतो. लहान वयात जी भावना, संकल्पना

स्पष्ट होते ती आयूष्यभर सोबत राहते तसेच संकल्पना समजून घेण्यासाठी मातृभाषा कधीच ओझे वाटत नाही इंग्रजी सारखी. इकडे मराठी माध्यमाच्या शाळांतील मुलांची स्थिती खुपच चांगली आहे, असेही छाती ठोकून सांगता येत नाही. कारण येथील मुलांची स्थिती सुध्दा मराठीच्या बाबतीत फारच वाईट आहे. मराठी भाषेला नीट समजून न घेता दरवर्षी एका नवीन वर्गाची पायरी चढत शाळेच्या बाहेर पडलेला जेव्हा समाजात व्यवहार करण्यास प्रारंभ करतो तेंव्हा निरक्षर व्यक्तीपेक्षा साक्षर व्यक्तीच मराठी भाषेला पदोपदी मारत असतांना आढळून येतो.

मात्र (मातृ) देवो भव, कार अपघातांत त्यांचा अंत्य (अंत) झाला, पाणी हे द्रव्य (द्रव) आहे. आज शिक्षक दीन (दिन) आहे, सचिनचा कर्म (क्रम) सौरभ नंतर येतो इत्यादी वाक्याचे बारीक निरीक्षण केल्यास कंसातील शब्दामुळे वाक्याचा अर्थ स्पष्ट होतो मात्र भाषेचे ज्ञान नसलेले किंवा अर्धवट ज्ञानी मंडळी एक प्रकारे भाषेचे चिरफाड करून वाक्याचे अनर्थ करून टाकतात. हे म्हणजे कसे आहे, गाडी नीट चालवता येत नसलेल्या व्यक्तीच्या हातात गाडी देऊन अपघात करून घेण्यासारखे नाही का ? ज्याप्रकारे गाडी चालवण्यासाठी परवानाची गरज भासते अगदी त्याच प्रकारे भाषेची मांडणी करणा-या व्यक्तीला विशेष ज्ञान असल्याचा परवाना आवश्यक नाही काय ?

लहानपणा पासून मुलांच्या बोलण्याकडे विशेष लक्ष देवून त्यांच्यात वारंवार सुधारणा घडवून आणण्याची जबाबदारी प्रत्येक पालकांनी घेणे आवश्यक आहे. प्राथमिक शाळेतून शिक्षण घेतांना मुलांना मराठीच्या जास्तीत जास्त शब्दाची तोंड ओळख कशी होईल ? याचे नियोजन प्रत्येक भाषा विषय शिकविणा-या शिक्षकांनी केले पाहिजे. शब्द पाहिले, ऐकले आणि लिहिले तरच त्याच्या कायम स्मरणात राहील. मराठी शब्दांच्या बाबतीत अगदी प्राथमिक शिक्षणाच्या पाया पासून श्रवण भाषण,वाचन आणि लेखन या (LSRW) चार टप्यानुसार चालते आणि शिक्षकांचे सुक्ष्म निरीक्षण असेल तर मुलांमध्ये भाषेचे फार कमी चुका होतील. परंतु विशेष करून येथेच दुर्लक्ष केल्या जाते आणि भविष्यात याच मुलांच्या हातून भाषेची चिरफाड होतांना दिसून येते. मराठी भाषा फार सोपी वाटत असेल तरी या विषयात अनुत्तीर्ण होणा-यांची

संख्या फार मोठी आहे. कारण स्वत:च्या भाषेत या मुलांना वर्णन करता येत नाही. त्यांना वेळेवर पर्यायी अर्थपूर्ण शब्द आठवत नाहीत किंवा खरा शब्द नेमकं कसा आहे? हे ही लक्षात येत नाही. सन 1960 साली भाषेनुसार महाराष्ट्र राज्याची निर्मिती झाली. परंतू गेल्या पन्नास वर्षात मराठीचा व्हावा तेवढा विकास झाला नाही. कारण या समस्येकडे कुणीच गांर्भीर्याने लक्ष देत नाहीत. यासाठी समाजातील प्रत्येक घटक तेवढाच जबाबदार आहे. त्यामुळे मराठीची प्रगती व्हावी, त्याचा विकास व्हावा,त्याची चीरफाड होवू नये असे वाटत असेल तर प्रत्येकाने आज जागे होणे अत्यंत गरजेचे आहे. शाळेतून विशेष करून मराठी भाषा शिकविणा-या शिक्षकांनी याविषयी गांभीर्याने दक्षता घेवून मुलांच्या भाषिक कौशल्याचा विकास करावा. इयत्ता पहिली व दुसरीमध्ये अनुलेखन ,तिसरी व चौथ्या वर्गात शुध्दलेखन आणि पाचवी ते आठव्या वर्गापर्यंत प्रत्येक विद्यार्थ्यांना श्रुतलेखन योग्य प्रकारे करता यावे असा किमान उद्देश डोळया समोर ठेवून कार्य केल्यास मुलांत वारंवार होणा-या चूका नक्कीच टाळता येतात. बहुतांश वेळा मुलांची श्रवण प्रक्रिया योग्य प्रकारे विकसीत न झाल्यामुळे समान आवाजाच्या शब्दात मुले घोळ करतात जसे खाक-काक, मखर–मकर , खेळ-केळ ,भार–बार, घार–गार , झरा–जरा ,झाग–जाग,धार–दार ,भाई–बाई , साफ–साप,फळ-पळ, संग-संत,बंध-बंद, फर–पर ,खल-कल, भाग–बाग, साथ–सात , पथ–पत,कोश-कोष, इत्यादी शब्द ज्यांची ध्वनी जवळपास सारखी वाटते आणि शब्दाचा अर्थ बदलतो. यानंरत मराठीत असेही काही शब्द आहेत ज्यांच्या -हस्व व दीर्घ इकार व उकार मुळे वाक्याचा अर्थच बदलून जातो. जसे की, आदी–आदि, आयत-आयात, आर्त–आर्द, स्त्री-इस्त्री, कोश–कोष, दिन–दीन, नियत-नीयत, केशर–केसर, पास–पाश, पिक–पीक, बहु–बहू, लक्ष-लक्ष्य, विष–वीस ,चालक-चालाक, इ. अशा बारीक सारीक बाबींकडे विषय शिक्षकांनी लक्ष दिल्यास मुलांच्या मराठी लेखनात नक्कीच सुधारणा होवू शकेल. संत ज्ञानेश्वर महाराजांनी माझा मऱ्हाटीचि बोलु कवतुके परी अमृतातेही पैजेसी जिंके असे म्हटले आहे तर प्रसिध्द गजलसम्राट सुरेश भट यांनी म्हटले आहे

लाभले आम्हास भाग्य बोलतो मराठी

जाहलो खरेच धन्य एक तो मराठी
धर्म, पंथ, जात एक जाणतो मराठी
एवढ्या जगात माय मानतो मराठी

मराठी भाषेचा विकास व्हावा व प्रगती व्हावी असे मनातून वाटत असले तर प्रत्येकांनी विशेष प्रयत्न करणे गरजेचे आहे. शालेय वयात इंग्रजी शब्दार्थ पाठांतर करीत असल्याचे आपणा सर्वांना आजही आठवते. मात्र मराठी शब्दार्थ पाठांतर आपण करतो कां? अर्थातच याचे उत्तर नाही असेच येते. इंग्रजी शब्दाची जास्तीत जास्त ओळख व्हावी म्हणून ऑक्सफर्डची डिक्शनरी प्रत्येकजण एकदा तरी हाताळलेला असतो. मात्र मराठीची शब्दासंपत्ती वाढवी म्हणून निदान मराठी विश्वकोषाचे खंड हे दूरचीच गोष्ट आहे निदान वसंत आबाजी डहाके यांचा शालेय मराठी शब्दकोशाचा शंभरामागे एखादा मराठी व्यक्ती हाताळतो. मराठी भाषेसाठी ही फार मोठी शोकांतिका आहे. त्यास्तव प्रत्येकाने आपली शब्दसंपत्ती कशी वाढविता येईल याचा जरूर विचार करावा. यासाठी मुलांना लहानपणा पासून विविध प्रकारचे मराठी शब्दकोडे सोडविण्याचा छंद कसा लागेल याकडे विशेष लक्ष द्यावे. वारंवार कोडे सोडविल्यामुळे खेळत खेळत मराठी भाषेच्या अनेक शब्दांची व त्याच्या अर्थाची ओळख होते. मराठी भाषेच्या विकासासाठी व भाषेची चिरफाड टाळण्यासाठी प्रत्येकांनी प्रयत्न करणे गरजेचे आहे.

परिमलांमध्ये कस्तुरी का अंबरामध्ये शंबरारी, तैसी मऱ्हाठी सुंदरी भाषांमध्ये, ही ओळ लक्षात ठेवून आपल्या मराठी भाषेचा अभिमान बाळगू या. मराठी भाषा गौरव दिनाच्या सर्वांना खूप खूप शुभेच्छा.

# तंत्रस्नेही शिक्षक : काळाची गरज

आजचे युग हे संगणकीय आणि नवनवीन तंत्रज्ञानाचे आहे. रोज काही ना काही नवीन महितीची भर पडत आहे. संगणक, मोबाईल आणि स्मार्ट फोन मुळे घरबसल्या बरीच माहिती मिळत आहे. एका क्लिक वर हवी ती माहिती क्षणात मिळण्याची सुविधा आत्ता निर्माण झालेली आहे. याच आधुनिक तंत्रज्ञानाचा वापर शाळेतील अध्ययन आणि अध्यापनात झाल्यास त्याचा फायदा विद्यार्थ्यांना नक्कीच मिळेल असा विश्वास शालेय विभागाचे शिक्षण सचिव मा. नंदकुमार साहेब, शिक्षण संचालक मा. गोविंद नांदेडे आणि शिक्षण आयुक्त पुरुषोत्तम भापकर साहेब यांना वाटतो. त्याच मुळे त्यांनी राज्यातून तंत्रस्नेही शिक्षकांची फौज तयार व्हावी यासाठी तालुका, जिल्हा, विभाग आणि राज्यस्तरावर तंत्रस्नेही शिक्षकासाठी कार्यशाळेचे आयोजन करीत आहेत.

आज राज्यात सर्वत्र डिजिटल शाळेचे वारे वाहत आहेत. अनेक गावातील जनता स्वयंस्फुर्तीने समोर येऊन शाळेला समृध्द कसे करता येईल ? याचा विचार करीत आहेत. 14 व्या वित्त आयोगातुन शाळेला मदत मिळत आहे. गावचे सरपंच इतर सदस्य, शालेय व्यवस्थापन समितीचे सदस्य, शाळेत यापूर्वी शिक्षण घेतलेले आणि सध्या चांगल्या पदावर काम करणारे गांवकरी, तसेच शाळेतील कार्यरत शिक्षक यांनी सर्वांनी मिळून शाळा डिजिटल आणि ज्ञानरचनावादी करण्याचा जणू विडा उचलला आहे असे चित्र सध्या राज्यात सर्वत्र दिसून येत आहे.

बदलत्या काळानुसार शिक्षकास सुध्दा बदलणे अत्यंत गरजेचे आहे. पूर्वीचा शिक्षक आणि त्याची अध्यापन पध्दती आत्ता मागे पडली आहे. तीच ती पुरातन पद्धत वापर करण्या

पेक्षा काही तरी नवीन शोध लावून त्या मार्गाचा वापर केले तर समाजात आपला टिकाव त्याशिवाय आपली धडगत नाही हे आत्ता शिक्षकांना कळून चुकले आहे. त्यामुळे आज प्रत्येक शिक्षक तंत्रस्नेही होण्याचा प्रयत्न करतोय आणि ते गरजेचे आहे. काळानुरूप जर आपण आपल्यात बदल केला नाही तर आपली विद्यार्थ्यात पालकात आणि समाजात काही पत राहणार नाही

आज शाळेतील सर्व योजना मग ते मुलांची शिष्यवृत्ती असो किंवा विद्यार्थ्याची सरल मध्ये माहिती भरणे असो ते आत्ता ऑनलाइन झाले आहे. शालेय पोषण आहार योजने अंतर्गत रोजच्या रोज लाभार्थी विद्यार्थी संख्या ऑनलाइन करण्याचे काम यावर्षी 15 जून पासून चालू करण्यात आले. स्वच्छ विद्यालय पुरस्कारसाठी ऑनलाइन नोंदणी केल्याशिवाय शाळेचा पुरस्कार साठी विचार केला जाणार नाही. शिक्षकांना राज्य पुरस्कार मिळविण्यासाठी या वर्षी पासून ऑनलाइन द्वारे च अर्ज दाखल करणे बंधनकारक करण्यात आले आहे. म्हणजे शालेय कारभारात आत्ता ऑनलाइन चे काम फार मोठ्या प्रमाणावर वाढले आहे. शिक्षकांचा पगार सुध्दा आज शालार्थ या ऑनलाइन प्रणाली द्वारे दिल्या जात आहे परंतु सध्या ही प्रक्रिया शिक्षक किंवा मुख्याध्यापक स्वतः तयार करीत नसून बाहेरील कमर्शियल व्यक्ती कडून करून घेत आहेत त्यामुळे शासन ज्या उद्देश्यासाठी प्रणाली सुरु केली ती असफल होताना दिसत आहे शिक्षक आणि मुख्याध्यापकच नाही तर अधिकारी मंडळी सुध्दा याच मार्गावरुन वाटचाल करीत आहेत यासाठी आर्थिक झळ सोसावे लागत आहे ती गोष्ट वेगळी नुकतेच बदल्याच्या प्रक्रिया पार पडल्या यात जवळपास हजारांच्या घरात बदल्या झाल्या पूर्वी च्या पद्धतीनुसार एका ठिकाणाहुन गमन आणि दुसऱ्या ठिकाणी उपस्थित झाले की संपले पण आज या शालार्थ प्रणालीत पूर्वी सारखे तर प्रक्रिया करावीच लागते शिवाय ऑनलाइन सुध्दा गमन आणि उपस्थित व्हावे लागते आणि त्यासाठी ज्याना जसे जमेल तसे ह्या बाहेरील व्यक्तिनी पैसे उकळले असल्याची चर्चा आज शिक्षक खाजगी स्वरुपात बोलत आहेत याला कारण एकच आहे आपण तंत्रज्ञानाशी मैत्री न करता त्यापासून दूर पळत राहिलो आणि त्याचा फायदा या व्यक्ती घेत आहेत यात त्याची काहीच चूक नाही ज्याप्रकारे आपणास काही आजार झाला असेल तर आपण डॉक्टर कडे जातो तो डॉक्टर एकही इंजेक्शन किंवा औषध न देता फक्त कागदावर ट्रीटमेंट लिहून देतो आणि आपण त्याला त्याची जे काही फी असेल 60 रूपया पासून 500 रूपया पर्यन्त त्याला देतो कारण त्याने त्याच्या जवळ असलेल्या ज्ञानाचा वापर आपल्या साठी केलेला आहे

त्यामुळे बाहेरील लोक अमुक काम करण्यासाठी तमुक पैसा घेतात एवढा खर्च शाळेच्या मुख्याध्यापकानी कसे समायोजन करावे यास फक्त एक आणि एकच उत्तर आहे ते म्हणजे तुम्ही सुध्दा तंत्रस्नेही बना संगणक शिका आणि त्या संगणकाचा वापर शालेय अध्यापनासोबत शालेय कामकाज मध्ये सुध्दा वापरल्याशिवाय पर्याय नाही आपली जुनी परंपरा थोडासा बाजूला सारून या नव्या तंत्रज्ञानाने मुलांना शिकवित राहिलो आणि शालेय व्यवस्थापनात याचा वापर केला तर आपल्या शाळेला, शाळेतील विद्यार्थ्यांना आणि वैयक्तिक आपणाला ही याचा फायदा नक्की होईल.

तेंव्हा चला तर मग आपण सारे तंत्रस्नेही शिक्षक बनू या आणि येत्या वर्षात संपूर्ण महाराष्ट्र प्रगत करू या.



# ई साहित्य प्रतिष्ठान

ई साहित्य प्रतिष्ठान मराठी साक्षरांमध्ये वाचनाची आवड निर्माण व्हावी आणि लेखक व कवींना एक सशक्त व्यासपीठ मिळावे या दुहेरी हेतूने स्थापन झाले. मराठीत एक जबरदस्त वाचन संस्कृती निर्माण व्हावी, तरुणांनी भरपूर वाचन करावे, ग्रामीण भागातील तरुणांना मोबाईलवर पुस्तके उपलब्ध व्हावीत, परदेशस्थ मराठी वाचकांना सहजासहजी इंटरनेटवर पुस्तके मिळावीत हे आमचे स्वप्न. जगातील चाळीस देशांतील सुमारे साडेतीन लाख वाचक या चळवळीचे सभासद आहेत. महाराष्ट्राच्या जवळपास प्रत्येक तालुक्यातील खेड्यापाड्यांत ई साहित्य चे वाचक आहेत. याशिवाय सुमारे तीस ते चाळीस लाख वाचक ई साहित्यच्या वेब्साईटला भेट देऊन पुस्तके डाऊन लोड करतात. पण याने आमचे समाधान नाही. जोवर महाराष्ट्रातील प्रत्येक साक्षर हा वाचक होत नाही तोवर ही चळवळ चालेल. आमचे लक्ष्य सहा कोटींचे आहे. आमच्या पाठीशी माऊलींचा आशिर्वाद आहे. " ईये मराठीचिये नगरी, ब्रह्मविद्येचा सुकाळू करी" ही त्यांची प्रार्थना आपणा सर्वांकरवी सुफ़ळ संपूर्ण व्हावी.

आमच्या वाचकांना एकच विनंती. आपल्या ओळखीच्या किमान दहा साक्षरांचे ई मेल पत्ते आम्हाला पाठवा. अशा रितीने आपण तीनाचे तीस आणि तिसाचे तिनशे होऊ. या मराठीचिये नगरी ब्रह्मविद्येचा सुकाळू व्हायला वेळ नाही लागणार. सर्वांची साथ असेल तर.

एवढी विनंती मान्य कराच.

ई मेल पत्ते esahity@gmail. com या पत्त्यावर पाठवा बरं!